''ऱ्हासाच्या संमोहाला हताशपणे चिकटून आपल्या थोर सांस्कृतिक वारस्याचे जतन करण्याच्या जबाबदारीची आठवणसुद्धा नको'' - असे म्हणणाऱ्या देशातील लोकांनी उद्धटपणे नाकारलेले व्यक्तिमत्त्व म्हणजे राजा राममोहन रॉय. पण प्रसंगच असा होता की, राग-द्वेषाने भरलेल्या वातावरणातसुद्धा राममोहन यांचे आगमन अपरिहार्य असेच होते. बदलणाऱ्या ऋतूचे राममोहन प्रतिनिधी होते. प्रदीर्घ दुष्काळानंतर पावसाच्या सरी याव्यात आणि होरपळलेल्या, वांझ जमीनीतून जीवनाचे वैभवशाली अंकुर फुटावेत तसे राममोहन रॉय यांचे आगमन हे दृष्यांतर भयचकित करणारे होते. आणि याचा खरा अर्थ लक्षात येण्यास कालावधी जाणे आवश्यकच आहे. पीक तयार झाल्यावर कापणी करणाऱ्याच्या लक्षात ते येते आणि मगच तो त्याची निःसंकोचपणे कबूली देतो. त्याप्रमाणे राममोहन रॉय यांचे आगमन म्हणजे देशबांधवांना असा एक अपघात होता की ज्याचे स्वागत करण्यास ते तयारच नव्हते. हा अपघात एकूणच वातावरणाच्या तुलनेत अमर्याद असा होता. तरीही राममोहन रॉय हे असे व्यक्तिमत्त्व होते ज्याची इतिहास रात्रंदिवस वाट पाहत होता. एक असा माणूस ज्याचे जीवन म्हणजे तो ज्या मातीतून जन्माला आला, तिच्या आत्म्याच्या आणि कार्याचा जणू मूर्तिमंत पुतळा.

- रवीन्द्रनाथ टागोर



Raja Rammohan Roy (Marathi), Rs. 25/-
ISBN 81-260-1924-7



भारतीय साहित्याचे निर्माते

# राजा राममोहन रॉय

सौम्येंद्रनाथ टागोर



भारतीय साहित्याचे निर्माते

# राजा राममोहन रॉय



साहित्य अकादेमी

लेखक
सौम्येंद्रनाथ टागोर

अनुवादक
श्रीनाथ तिवारी

## अनुक्रम

# 1

## सूर्योदयापूर्वीचा अंधकार

आधुनिक भारताच्या इतिहासातील तो खरोखरच काळाकुट्ट कालखंड होता. जुनी समाजरचना आणि राज्यव्यवस्था मोडकळीस आली होती आणि तिचे अवशेष इतस्तत: विखुरलेले होते. या अवशेषांचा ढिगारा बाजूला सारून प्राचीन व्यवस्थेच्या पायावर नव निर्माण करण्याचा प्रयत्नही होत नव्हता. मृत परंपरा, कालबाह्य रीतीरिवाज आणि अविवेकी धर्मान्धता यांनी राष्ट्राचा जीवनप्रवाह अवरुद्ध करून टाकला होता. ज्ञान संपुष्टात आले होते. तो एक जणू काही न संपणाऱ्या काळोखाचा कालखंड होता.

राजा राममोहन रॉय यांचा उदय अशा प्रकारच्या दुष्काळग्रस्त आणि रूक्ष कालखंडात झाला.

मानवी संस्कृतीच्या इतिहासात अदृश्यरूपाने कार्यरत असलेली सर्जनशील सघन ऊर्जा आणि काल–शक्तीचे, लोकोत्तर पुरुष हे केन्द्रबिंदू असतात. लोकोत्तर व्यक्तिमत्त्वाची सार्थकता किंवा त्याच्या व्यक्तिमत्त्वाची थोरवी ही त्याच्या वाट्याला आलेले ऐतिहासिक कार्य ओळखण्याच्या त्याच्या क्षमतेत असते, ऐतिहासिक प्रवाहाचा मूळ गाभा शोधण्यात असते आणि शेवटी त्या कार्याच्या पूर्ततेसाठी दृढ आणि कृतनिश्चयी होऊन अत्युत्तम सर्जनशील अशी कृती करण्यामध्ये ही थोरवी सामावलेली असते. अशा अत्युच्च निर्मितीक्षम प्रक्रियेमध्ये मानवी व्यक्तिमत्त्व हे अनेक परस्परविरोधी गुणविशेषांचे एक विचित्र मिश्रण बनते. हे एकीकडे अत्यंत निर्वैयक्तिक बनते तर दुसरीकडे ते अत्यंत व्यक्तिकेंद्री बनते. निर्वैयक्तिक या अर्थाने असते की, आत्मप्रौढीच्या एका कणाचाही स्पर्श त्याच्या आदर्शांना मलीन करीत नाही. ते व्यक्तिकेंद्री यासाठी, की त्याचे सर्व आदर्श भौतिक पातळीवर एका व्यक्ति-विशेषातच साकार झालेले असतात. मानवी इतिहासात घडणारी ही दुर्मिळ गोष्ट असली तरी अशा गोष्टी इतिहासात वारंवार घडतही असतात.

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात जेव्हा राजा राममोहन रॉय यांचे भारतीय इतिहासाच्या रंगमंचावर पदार्पण झाले. इस्लामी राज्यव्यवस्था जीर्णशीर्ण होऊ लागली होती. भारतात

व्यापारी म्हणून आलेले इंग्रज हळूहळू या देशाचे शासक म्हणून वावरू लागले होते. इ. स. 1757 मध्ये झालेल्या प्लासीच्या लढाईने बंगालच्या विनाशाचे भवितव्य आधीच पंधरा वर्षांनी अलीकडे आणून ठेवले. अराजकाचे थैमान चालू असले तरी एक नवी व्यवस्था सावकाश पुढे येऊ लागली होती. पाश्चात्त्य जगाचे अग्रदूत म्हणून भारतात आलेले इंग्रज फक्त वाणिज्यविषयक घडामोडीचेच दलाल म्हणून नव्हे तर ऐतिहासिक घटनाक्रमाचे माध्यम म्हणून भारताला त्याच्या औदासीन्यातून ढवळून काढून नव्या विचारांची आणि कृतीची लाट जुन्यापुराण्या इतिहास-प्रवाहातून निर्माण करण्यासाठी आले होते.

भूतकाळात, इस्लामच्या भारतातील आगमनानंतर, अनेक थोर द्रष्टे हिंदू विचारप्रणाली आणि इस्लामचा सांधा जोडून द्यायच्या ऐतिहासिक निकडीचे कार्य करण्यासाठी पुढे सरसावले. दादू, कबीर, गुरुनानक यांसारख्या अनेक मार्गदर्शकांनी हे महान कार्य पूर्ण करण्यासाठी महत्त्वाची भूमिका बजावली. हे कार्य दोन विचारप्रणालीतला वेगळेपणा दाखवून पूर्ण होण्यासारखे नव्हते, कारण या प्रक्रियेत वरवरचे वेगळेपणच अधोरेखित होते. पण जर समन्वयवादी भूमिका घेऊन वेगवेगळ्या तत्त्वांचे अंतर्भूत परस्परावलंबित्व, संबंधसूत्र आणि त्यातील ऐक्य यावर भर दिला तर हे महान कार्य पूर्ण होऊ शकते. हे संश्लेषणात्मक ऐक्य प्राप्त करणे हे त्या काळच्या पाश्चात्त्य जगाचे मध्यवर्ती कार्य होते आणि हे ऐतिहासिक कार्य करण्यासाठी नियतीने राजा राममोहन रॉय या भारतीय माणसाची निवड केली होती.

# 2

## जन्म आणि सुरुवातीचा संघर्ष

राममोहन रॉय यांचा जन्म राधानगर नावाच्या एका खेड्यामध्ये 22 मे 1772 रोजी झाला. त्या वेळी हे गाव बरद्वान जिल्ह्यात होते आणि नंतर हुगळी जिल्ह्यातील आरामगड उपविभागात ते सामील करण्यात आले. हे चिमुकले खेडे खानाकुल – कृष्णानगर या अतिशय समृद्ध अशा खेड्याच्या उत्तरेला वसलेले होते. त्या काळामधे खानाकुल हे हिंदू संस्कृतीचे एक प्रसिद्ध असे केंद्र होते. राममोहन रॉय यांचा जन्म या गावातील एका कर्मठ अशा ब्राह्मण कुटुंबात झाला. ह्या घरातील अनेक कर्ते पुरुष मुसलमानी राजांच्या पदरी मुर्शिदाबाद येथे कामाला होते. राममोहन यांचे पिता रमाकांत रॉय हे एक कर्मठ परंपरावादी आणि हिंदू धर्मशास्त्रांचे काटेकोर पालन करणारे गृहस्थ होते. माता फुलठकुरानी एक कुशाग्र बुद्धिमान आणि दृढनिश्चयी महिला होती.

फुलठकुरानी यांना दोन मुले – राममोहन व जगमोहन – आणि एक कन्या होती. प्राथमिक शिक्षणाचे धडे आपल्या गावातील शाळेतच गिरवताना राममोहन यांनी एका मौलवीच्या मार्गदर्शनाखाली फारसी भाषेचा अभ्यास केला. यानंतरच्या शिक्षणासाठी त्यांना पटणा ह्या शहरात पाठविण्यात आले. पटणा हे शहर त्या काळी इस्लामी संस्कृतीच्या अभ्यासाचे मोठे केंद्र होते.

तेथे गेल्यावर राममोहन यांनी अरबी, फारसी, कुराण, इस्लामी धर्मशास्त्र, त्याचबरोबर अरबी भाषेत भाषांतरित झालेल्या युक्लिड व अरिस्टॉटल इ.च्या लेखनाचा सखोल अभ्यास केला. कुराणमध्ये असलेली लोकशाहीची शिकवण आणि अरबी भाषेतील तर्कसंगत विचार आणि तत्सम विवेकवादी विचारप्रणालींचा आणि त्यातही मोतझिल[1] आणि सूफी तत्त्वज्ञानाचा राममोहन रॉय यांच्यावर बराच प्रभाव पडला.

---

[1] मोतझिला या विवेकवादी विचारप्रणालीची स्थापना आठव्या शतकात बसरा येथे वसील-बिन-अता आणि अम्र-विन-उबैद यांनी केली. ईश्वर दिसू शकत नाही. जे काही करायचे ते माणूस स्वत: करतो, ईश्वर काहीही करत नाही, असे या विचारप्रणालीचे सूत्र आहे.

पटण्याहून परत आल्यावर राममोहन यांनी हिंदू समाजातील अंधविश्वास आणि मूर्तिपूजा या विषयावर एक प्रबंध लिहिण्यास सुरुवात केली. याबाबतीत अत्यंत कर्मठपणा असणाऱ्या त्यांच्या वडिलांनी त्यांना तात्काळ घर सोडून जाण्याचा आदेश दिला. राममोहन रॉय यांनी घर सोडले आणि त्यांची भटकंती सुरू झाली. ह्या भटकंती दरम्यान त्यांनी तिबेटला भेट दिली. बौद्ध धर्मात घुसलेल्या मूर्तिपूजेवर टीका केल्याने तिबेटमध्ये राममोहन यांनी तिबेटी लामांचा रोष ओढवून घेतला. आपल्या जीवनातील ह्या घटनेबद्दल त्यांनी आपल्या आत्मचरित्रात लिहिताना म्हटले आहे, ''वयाच्या सोळाव्या वर्षी मी एक लेख लिहिला होता ज्यामधे हिंदू धर्मातील मूर्तिपूजेबद्दल कैक प्रश्नांचा मी ऊहापोह केला होता. या विषयाच्या माझ्या भावनांकडे पाहता माझ्या मित्रांनी मला थंड प्रतिसाद दिला. याच वैचारिक अवस्थेत मी अनेक देशांचा प्रवास केला. पण मी हा प्रवास मोठ्या प्रमाणावर हिंदुस्थानात केला तर थोड्या प्रमाणात बाहेरच्या देशातही केला.''

काही वर्षे भ्रमंती केल्यावर शेवटी राममोहन वाराणसीला आले. तेथे त्यांनी कित्येक वर्षे हिंदू तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. 1803 साली त्यांच्या वडिलांचे निधन झाले. त्यानंतर अल्पावधीतच राममोहन मुर्शिदाबाद येथे आले. तेथील वास्तव्यात त्यांनी 'तुहफात–उल–मुवहिद्दीन' (एकेश्वरवाद्याला भेट) हा निबंध फारसी भाषेत लिहिला. त्याची प्रस्तावना अरबी भाषेत होती.

या प्रस्तावनेमध्ये त्यांनी एकेश्वराच्या अस्तित्वाबद्दल मानवजातीत सर्वसाधारणपणे आढळणाऱ्या एकवाक्यतेकडे लक्ष वेधले आणि त्याचबरोबर या एकेश्वरवाद्याच्या अस्तित्वाला जेव्हा गुणविशेष जोडले जातात तेव्हा निर्माण होणारी मतभिन्नता याकडेही लक्ष वेधले. संप्रदायवाद्यांवर कडक प्रहार करताना राममोहन लिहितात, ''मी जगामध्ये दूरदूरपर्यंत प्रवास केला. पर्वत–डोंगरांवर आणि पठारी प्रदेशांवर बसलेल्या ना-ना संस्कृतींचा अभ्यास केला. ह्या अभ्यासांती मला असा अनुभव आला की, जगाचा नियंत्रक व निर्माता असलेल्या अशा एकाच ईश्वरावर ह्या वेगवेगळ्या भागांत राहणाऱ्या रहिवाशांचा विश्वास आहे. त्याचबरोबर हे लोक त्या दैवी अस्तित्वाच्या (पृथक पृथक) विभिन्न पंथीय भेदाभेदांवर आणि धार्मिक मान्यतांवर विश्वास ठेवत नाहीत. ते 'हराम' (त्याज्य) व 'हलाल' (वैध) च्या संकल्पनांचा पुरस्कार करतात. यामुळेच प्रेरित होऊन मी अशा निष्कर्षाप्रत येऊन ठेपलो की, एकच एक शाश्वत अशा ईश्वराच्या सन्मुख होणे ही अखिल मानवजातीची मूल प्रवृत्ती आहे आणि ही प्रत्येक व्यक्तीमध्ये आपणास दिसून येते. एखाद्या देवाची किंवा देवतांची विशिष्ट जाती-पंथामध्ये जी व्याख्या किंवा काही गुणविशेष पाहिले जातात किंवा काही पूजापद्धती व भक्तीचे प्रकार सापडतात, ते सर्व सवयीने अथवा संस्काराने दृढ केलेले असतात.

याच निबंधामध्ये त्यांनी धर्म आणि धार्मिक अनुभूतींची तर्कसंगती ह्या प्रश्नावर प्रामुख्याने प्रकाश टाकला. ते लिहितात, 'धन्य आहे त्या माणसांचा देश जिथले लोक सवयीचा परिणाम आणि वरचेवर आलेल्या सहवासातून घडलेल्या गोष्टी, मनुष्यजाती आणि व्यक्तींमध्ये नैसर्गिक लालसेमुळे निर्माण होणारे अंगभूत गुण यामध्ये फरक करू शकतात आणि जे आपल्या प्रयत्नांची शिकस्त करून माणसाने अवलंबलेल्या धर्माच्या खरेखोटेपणाची निष्पक्षपणे शहानिशा करू शकतात आणि मोठमोठ्या व्यक्तींनी स्वीकार केलेल्या गोष्टींचा, त्या व्यक्ती मग कितीही मोठ्या पदावर असोत त्याची पर्वा न करता त्याचे मूल्यांकन करू शकतात.''



अनेक धर्मांच्या तौलनिक अभ्यासावर भर देत असताना त्यांनी जगाचे लक्ष एकेश्वरवाद्यांच्या उपलब्धींकडे वेधण्याचा प्रयत्न केला. राममोहन लिहितात, ''कोणी एखादी व्यक्ती काही काळापुरती एखाद्या धर्माच्या आहारी गेलेली असली तरी त्या आधी किंवा नंतर कधीतरी ती व्यक्ती धर्माच्या तत्त्वांच्या स्वरूपाबद्दल – मग ते प्राथमिक असो वा दुय्यम असो किंवा एखाद्या देशात त्यांचा प्रसार प्रचार झालेला असो, चौकसपणाने निष्पक्षपातीपणाने व न्याय्यपद्धतीने ह्या धार्मिक मान्यता आणि तत्त्वांची उलटतपासणी करतेच, कारण ही प्रवृत्ती बुद्धिवान मानवामध्ये निसर्गतः अनुस्युत आहे. असा माणूस असत्यापासून सत्याचे वेगळेपण जाणू शकेल अशी आशा करता येते, नित्य तत्त्वांना अनित्य तत्त्वांपासून भिन्नपणाने जाणू शकतो. हा माणूस मग धर्माच्या निरुपयोगी बंधनातून मुक्त होऊ शकतो. अशा व्यक्तीला या प्रक्रियेतून जात असताना काहींच्या पूर्वग्रहांना बळी पडावे लागते तर अनेकदा शारीरिक व मानसिक त्रास सहन करावा लागतो; पण अशीच व्यक्ती ईश्वर एक आहे हा संदेश जगाच्या सद्भावपूर्ण संघटनासाठी देण्याचे कार्य करील आणि समाजाच्या कल्याणाकडे बारकाईने लक्ष देईल.''

अंधविश्वास आणि अज्ञान यांना जबाबदार असलेला घटक म्हणजे कार्यकारणभाव आणि त्याचे परिणाम यांमध्ये चिकित्सकपणे सहसंबंध प्रस्थापित करण्याची असमर्थता होय. याबाबतीत आपले मत मांडताना राममोहन लिहितात, ''सवयी, रूढी आणि अंधविश्वास यांमुळे एखाद्या घटनेच्या कार्यकारण परंपरेची तर्कसंगत शहानिशा होऊ शकत नाही. उदा – लोक नदीमध्ये स्नान करणे, एखाद्या झाडाची पूजा करणे किंवा महाराज बनून इतरांच्या पापांचे प्रायश्चित विकत बसणे किंवा त्या त्या धर्मानुसार असलेले याच प्रकारचे आचरण करणे ह्या सर्व बाबींकडे मुक्तीचे मार्ग किंवा सर्व पापक्षालनाचे उपाय म्हणून पाहतील. खरे म्हणजे अशा प्रकारच्या गोष्टी केल्याने अथवा आचरणाने काहीही फरक पडत नाही. कोणावरही त्याचा प्रभाव पडत नाही, मग ते मानणारे असोत वा न मानणारे असोत. पण अशाप्रकारचे अंधश्रद्धापूर्ण आचरण करणारे लोक ह्या मतावर ठाम असतात की, त्यांना ह्याच मार्गाने अशाच आचरणाने अथवा अशाच साधू-गोसाव्यांच्या मार्गदर्शनाने मुक्ती मिळते. यातून अंधश्रद्धेला खतपाणी मिळते हे त्यांच्या लक्षात येत नाही. असे असते तर मग ह्या अंधश्रद्धायुक्त काल्पनिक गोष्टींच्या आचरणाने केवळ एकाच देशातीलच नव्हे तर सर्व जगातील वेगवेगळ्या मान्यता असलेल्या सर्व धर्मांच्या अनुयायांना ही मुक्ती सारखेपणाने मिळावयास हवी होती. सर्वांना सारखाच प्रभाव

अनुभवास आला असता. विष हे कोणीही, कोठेही मिष्टान्न म्हणून जरी घेतले तरी त्याचा होणारा परिणाम सेवन करणाऱ्यावर सर्वत्र सारखाच होणार नाही का? तसेच हे आहे.

धार्मिक मान्यतेनुसार मांडण्यात आलेल्या अलौकिक सिद्धांतांवर किंवा चमत्कारांवर राममोहन यांनी कधीच विश्वास ठेवला नाही, उलट त्यांची चांगलीच हजेरी घेताना ते लिहितात, ‘‘एखादी घटना, कृती किंवा गोष्टीमागचे कारण लक्षात आले नाही अथवा तिचे योग्य आकलन झाले नाही तर त्या प्रत्येकामागे काहीतरी अलौकिक चमत्कार आहे – असे मानणे ही प्रथा सामान्यपणे सर्वसामान्य माणसांमध्ये चांगलीच रूढ झालेली आहे. सत्य परिस्थिती अशी आहे की, या जगात प्रत्येक घटना परस्पर निगडित असून त्यांचा एकमेकांशी काहीना काही कार्यकारणभावात्मक संबंध असतो. ह्याच कार्यकारणभावांनी या विश्वात घडणारी प्रत्येक घटना परस्परावलंबी असते. सुदूर कारणांची चर्चा केली असताना असे जाणवेल की निसर्गातील प्रत्येक गोष्टीचे अस्तित्व हे इतर अनेक बाबींशी निगडित आहे. पण अनुभवांच्या कमतरतेमुळे, काही विशिष्ट प्रकारच्या लहरीपणाच्या प्रभावामुळे काही घटनांची योग्य कारणमीमांसा न होता त्यामागचे तथ्य काही एक लोकांसाठी अनाकलनीय रूप धारण करते. काही लोक मात्र ह्या गोष्टीचा धूर्तपणाने फायदा उचलतात आणि अशा गोष्टी आपल्याच दैवीशक्तींचा आविष्कार असल्याचे सांगून लोकांना आकृष्ट करतात.’’

अशा प्रकारच्या सदोष अलौकिक शक्तींपासून आपले रक्षण करण्यासाठी विगमनात्मक कारणमीमांसेच्या जोपासनेवर राममोहन रॉय भर देतात. ते लिहितात, ‘‘अशा प्रकारच्या ‘अलौकिक’ कृत्यांपासून स्वत:ची फसगत करून घ्यावयाची नसेल तर सुज्ञ आणि बुद्धिवंत लोकांनी तर्कसंगतीचा गुण अंगी बाणवावयास हवा.’’

या संदर्भात जास्तीत जास्त असे म्हणता येईल की, काही सन्मान्य अपवादात्मक अशा आश्चर्यकारक घटनांच्या मागे असलेला कार्यकारणभाव काही वेळा लक्षात येत नाही. अशा घटनांच्या बाबतीत वेगळेपणाने विचार करताना स्वत:च्या अंत:प्रेरणेची मदत घेतली पाहिजे आणि त्याची शहानिशा केली पाहिजे. अशी चौकशी करताना काहीं प्रश्न उपस्थित करावेत, उदा. ती घटना आपल्या मनाला पटणाऱ्या काही कारणांच्या आसपास मिळतीजुळती आहे का? – किंवा मग त्या घटनेमागे निसर्गनियमांचे उल्लंघन करून अशक्य कोटीतील एखादे कारण आहे काय? – इत्यादी.’’

लोकांच्या वागण्यातील विसंगती दाखवून देताना राममोहन लिहितात, ‘‘सर्वसाधारणपणे सामान्य जनतादेखील आपल्या रोजच्या व्यवहारात दोन वेगवेगळ्या बाबींमधील कार्यकारण-भाव जाणून घेतल्याशिवाय एका गोष्टीला ‘कारण’ आणि दुसरीला ‘कार्य’ म्हणून मान्यता देत नाहीत. जेव्हा धर्म आणि श्रद्धेचा प्रश्न उपस्थित होतो तेव्हा एका बाबीला ‘कारण’ आणि दुसरीस ‘कार्य’ म्हणून स्वीकारावयास मागेपुढे पाहत नाहीत. त्या दोन बाबींमध्ये कसलाही परस्परसंबंध नसला तरीही! उदाहरण द्यावयाचे झाल्यास देवाची प्रार्थना करून किंवा ‘दुवा’ मागून संकट निवारण करणे अथवा जादूटोणा करून तंत्रमंत्राच्या मदतीने रोगव्याधी दूर करणे. इ.’’



चमत्कार आणि इतर अशाच प्रकारच्या घटनांवर कडाडून प्रहार करताना राममोहन यांनी ह्या गोष्टींना संपूर्णपणे नाकारले. इतकेच नव्हे तर त्यांच्या मते ‘देवातही निसर्ग नियमांचे उल्लंघन करण्याची क्षमता नाही’ असे टोकाचे विधान याबाबतीत ते करतात. ते लिहितात, ‘‘अशक्यप्राय गोष्टींची निर्मिती करणं हे त्या विधात्यालाही शक्य नाही. उदा. त्या नियंत्यासोबत सहकारी बनणं अथवा त्याचं अस्तित्व नष्ट करणं अथवा दोन परस्पर विरोधी तत्त्वांची एकजूट, इ.’’

‘प्रेषित आणि संतपुरुषांच्या माध्यमातून ‘देव’ आपल्याला मार्गदर्शन करत असतात’ – ह्या सर्वसामान्य समजुतीला त्यांनी आव्हान दिले. या संदर्भात तर्कसंगत विचारांना त्यांनी प्राधान्य दिले. ते म्हणतात, ‘‘संत आणि प्रेषितांचा उदय हा बाह्य आणि भौतिक कारणांवर अवलंबून असून त्यांचा संबंध आंतरिक अथवा दैवी बाबींशी कशाप्रकारानेही निगडित नसतो. तो संशोधकांच्या संशोधनावर अवलंबून असतो. ‘तुहफात–उल–मुवहिदीन’ या ग्रंथाचा साकल्याने परामर्श घेण्यात एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीलाच राममोहन यांचे मूलभूत धार्मिक विचार कसे होते हे सादर करण्याचा माझा उद्देश आहे. या वेळेपर्यंत राममोहन यांच्या मन:पटलावर वैश्विक स्तरावरील एकेश्वरवादाची संकल्पना स्पष्टपणे आकार घेत होती.

या दरम्यान त्यांनी ईस्ट इंडिया कंपनीच्या महसूल विभागांची नोकरी पत्करली. भागलपूर, रामगड आणि इतर ठिकाणी नोकरी केल्यानंतर ते उत्तर बंगालमधील रंगपूर ह्या गावी 1809 मधे मि. जॉन डिग्बी या महसूल अधिकाऱ्याचे सहाय्यक म्हणून रुजू झाले. 1809 ते 1814 ह्या रंगपूर येथील वास्तव्यात त्यांनी आपला फावला वेळ गाढा अभ्यास आणि चर्चेसाठी कारणी लावला. ह्याच कालावधीमध्ये त्यांची ओळख हरि हरेंद्र तीर्थस्वामी नावाच्या बहुश्रुत अशा तांत्रिक विद्वानाशी झाली. त्यांच्या मदतीने राममोहन यांनी तांत्रिक साहित्याचा सखोल अभ्यास केला. रंगपूर हे गाव त्या काळी एकप्रकारे सर्वधर्म आणि जातींच्या लोकांचे होते जेथे मुसलमान आणि जैन इ. व्यापारानिमित्त एकत्र येत असत. त्यांच्या संपर्कामुळे राममोहन यांनी जैनधर्माच्या ‘कल्पसूत्र’ आणि इतर धार्मिक ग्रंथांचा अभ्यास केला. रंगपूर येथे असताना राममोहन यांनी इंग्लंड आणि युरोपातील राजकीय घडामोडींमध्ये जास्त रस घेण्यास सुरुवात केली. डिग्बी यांनी इंग्लंड मधून आणवलेली सर्व वर्तमानपत्रे आणि मासिके वाचण्याची राममोहन यांनी सवयच करून घेतली. यामुळे एकीकडे त्यांचे इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व वाढण्यास मदत झाली तर दुसऱ्या बाजूला त्यांच्या युरोपच्या राजकीय क्षेत्राच्या ज्ञानामध्ये मोलाची भर पडली. डिग्बी यांच्या मताप्रमाणे राममोहन हे तत्कालीन युरोपातील राजकीय क्षेत्रामधील उदारमतवादाने खूपच प्रभावित झाले होते.

# 3
# कलकत्ता येथील कार्य

श्री डिग्बी 1814 मध्ये भारत सोडून गेले आणि हे एकप्रकारे चांगलेच झाले, कारण यानंतरच राममोहन यांनी ईस्ट इंडिया कंपनीतील प्रदीर्घ सेवेचा राजीनामा दिला आणि ते कलकत्त्यामध्ये स्थायिक झाले. या वेळेपर्यंत राममोहन हे आपल्या जीवनकार्याचा आरंभ करण्यासाठी सज्ज झाले होते. शेकडो वर्षांपासून भारतीय जाणिवा ज्या रूढी, परंपरा, कर्मकांड आणि अंधविश्वास यांच्या गडद पडद्याआड दडपल्या गेल्या होत्या त्यांना मुक्त करणे आणि त्या जाणिवांचा आधुनिक जगाच्या जिवंत विचारप्रवाहांशी सार्थक संवाद प्रस्थापित करण्याचा प्रयत्न त्यांनी सुरू केला.

यासाठी त्यांनी आपली स्वत:ची एक वेगळीच पण वैशिष्ट्यपूर्ण अशी कार्यपद्धती शोधून काढली होती. त्यांनी धर्मशास्त्रांच्या अधिकाराची सवंगपणे पायमल्ली केली नाही पण त्याच वेळी हेही ठामपणे सांगितले की, मानवाच्या अत्युच्च जाणिवांचा पाया केवळ धर्मशास्त्रांवर आधारलेला नसावा. त्याला सारासार विवेक आणि तर्कसंगतीची जोड असणे आवश्यक आहे. यासाठी त्यांना मीमांसा पद्धतीने ज्ञान प्राप्त करण्याचा मार्ग अतिशय योग्य वाटला. ह्या पद्धतीमध्ये एखाद्या प्रश्नापासून सुरुवात केली जाते. मग त्या संदर्भातील सर्व शंकांचे निरसन केले जाते, त्या प्रश्नाच्या अधिकृतपणाची पृच्छा होते आणि मग आलेला निष्कर्ष हा पुनर्तपासणीसाठी घेतला जातो.

1815 मध्ये प्रकाशित वेदांताच्या बंगाली भाषांतराच्या प्रस्तावनेत राममोहन म्हणतात, ‘‘शास्त्रांनी आणि विवेकाने नेमून दिलेल्या मार्गाचा अवलंब आपण केला पाहिजे व त्यामुळे या आणि नंतरच्या जन्मामध्येदेखील मन:शांतीचा अनुभव आला पाहिजे.’’ केनोपनिषदाच्या इंग्रजी आवृत्तीच्या प्रस्तावनेत त्यांनी असे जाहीरपणे लिहिले आहे की, शास्त्रं, विवेक आणि देवाची दया ह्या तीन गोष्टी ‘सत्य’ प्रस्थापित करण्यासाठी आवश्यक आहेत. ते म्हणतात, ‘‘केवळ शास्त्रं आणि विवेकबुद्धी यांना संपूर्ण शरण जाणं हाच एक उपाय नसून या दोहोंच्या साहाय्याने तर्कसंगती व नैतिकतेचे ज्ञान आलोकित केले पाहिजे. यानंतरची पायरी म्हणजे दैवी अनुग्रह.’’

शास्त्रांच्या संदर्भात लिहिलेल्या अनेक निबंधांमधून राममोहन यांनी ‘वशिष्ठ’च्या या ओळी अनेक वेळा उधृत केल्या आहेत. ‘‘एखाद्या बालकानं जर काही तर्कसंगत गोष्ट



सांगितली तर ती स्वीकारली पाहिजे, पण जर ब्रह्मांनी स्वत: जरी एखादी अतर्क्य गोष्ट सांगितली तर ती काडीकचऱ्याप्रमाणे फेकून दिली पाहिजे.’’

उपनिषदांमध्ये असे म्हटले आहे की, त्या पूर्ण ‘परब्रह्म’ परमात्म्याची प्रचीती घ्यावयाची असेल तर मन, संवेदना आणि बुद्धीच्या मार्गाने जायला हवे. ‘‘पण ब्रह्मतत्त्व म्हणजेच देवाच्या अस्तित्वाचे ज्ञान ही काही अतिमानवी गोष्ट असून आपल्या जाणिवा–नेणिवेच्या कक्षेतली गोष्ट नाही.’’ असे उपनिषदांनी कोठेच म्हटले नाही. किंवा त्या ब्रह्मतत्त्वाच्या प्राप्तीसाठी शास्त्रपारंगत असावेच लागते असेही म्हटलेले नाही. जगाच्या उत्पत्ती, स्थिती आणि ‘लय’ ह्या जीवनचक्राच्या उदाहरणावरून वेदांतामध्ये त्या परतत्त्वाची विश्वाचा मूलाधार असल्याची संकल्पना मांडली आहे. यावरून हे सिद्ध होते की, त्या परतत्त्वाची अनुभूती ही मन, बुद्धी आणि चिकित्सेच्या साहाय्याने सहजपणे घेता येते. अंतिम सत्याप्रत पोहोचण्याची बुद्धिप्रामाण्यवादाची कार्यपद्धती अवलंबण्याचा मार्ग राममोहन यांनी स्वीकारला. याचबरोबर शास्त्रांच्या अधिकारावर त्यांनी कधीही आक्षेप घेतला नाही. त्यांचे मत एवढेच होते की, पूर्ण विचार आणि चौकशी करून, समजून घेतल्याशिवाय शास्त्रांची शिकवण अंधपणाने स्वीकारू नये.

सन 1815 मध्ये राममोहन यांनी ‘आत्मीय सभा’ नावाच्या एका सभेची स्थापना केली. या संघटनेद्वारे त्यांनी ‘कलीनीझम’ अर्थात मुलींची विक्री- प्रथा व जातिसंस्था यांच्या विरोधात जोरदार आंदोलन चालवले. ह्याच संस्थेमार्फत राममोहन यांनी स्त्रियांना त्यांच्या पैतृक संपत्तीत व नवऱ्याच्या संपत्तीतील हक्कांबाबत मान्यता मिळविण्याचे कार्य अविरतपणे सुरू केले. ह्या सभेचा शेवट 1819 मध्ये झाला. ब्रिटिश पुराणमतवाद आणि वसाहतवादाचा पुरस्कार करणारे समाचारपत्र ‘जॉनबुल’ व कर्मठ हिंदुत्वाचा पुरस्कार करणारे ‘समाचार चंद्रिका’ या दोहोंनी एकत्रितपणे राममोहन यांच्या उदारमतवादावर आपल्या वर्तमानपत्रातून टीकास्त्र सोडले. हिंदू धर्मसभेनेसुद्धा राममोहन रॉय यांचा कडवेपणाने विरोध केला. हिंदू कट्टरवादी तर राममोहन यांच्या जिवावर उठले होते. पण राममोहन यांनी स्पष्टपणे हे जाहीररीत्या सांगितले, ‘‘हिंदू धर्मावर मी कधीच प्रहार केले नाहीत. माझा विरोध हा अंधविश्वास आणि धर्मान्धतेला आहे.’’ सतीप्रथेच्या निर्मूलनासाठी ते जेव्हा अथक परिश्रम घेत होते तेव्हा धर्मसभेने त्यांचा कडाडून विरोध केला. या संदर्भात प्रसिद्ध पौर्वात्यवादी अभ्यासक श्री. होरेस हेमन विल्सन यांचे उद्गार लक्षवेधी आहेत. ते म्हणतात, ‘मी या निर्णयाप्रत आलो आहे की सतीप्रथेचे निर्मूलन करणे म्हणजे हिंदू धर्मात फार मोठी ढवळाढवळ करण्यासारखे आहे,’’ पण हे खरं नसल्याचं राममोहन यांनी सिद्ध केलं. फ्रांसिस बॅथी नावाचा कलकत्ता उच्च न्यायालयाचा एक वकील होता. त्याची नियुक्ती धर्मसभेने संसदेमधे आपली बाजू मांडून विधवांचे सती म्हणून दहन करण्याची परवानगी मागण्यासाठी केली. बॅथी आपल्या कलकत्ता येथील भाषणामधे हिंदूंना म्हणाला,

''मी या केसच्या संदर्भात इंग्लंडला जात ओ. तुमच्या मागण्या मान्य होतील व त्यासाठी मला कोणतेच शब्दांचे, शारीरिक अथवा मानसिक कष्ट पडणार नाहीत. माझ्या कामात मी तसूभरही कुचराई करणार नाही.'' पण ह्या सुयोग्य इंग्रज माणसाच्या प्रयत्नांतीही सतीची चाल केवळ राममोहन रॉय यांच्या अलौकिक प्रयत्नांमुळे नामशेष झाली.

सन 1815 मध्ये राममोहन यांनी 'वेदांतसूत्र' बंगालीमध्ये तर 1816 मध्ये 'वेदांतसार' बंगालीमध्ये आणि 'वेदांत' इंग्रजीमध्ये अशी भाषांतरे केली. त्याच वर्षी त्यांनी ईशोपनिषद आणि केनोपनिषदाचे बंगाली आणि इंग्रजीत भाषांतर केले. इ. स. 1817 मध्ये कठोपनिषद आणि मांडुक्योपनिषदचे बंगालीत भाषांतर केले. त्या काळी बंगाली व इंग्रजी भाषांतराच्या प्राथमिक प्रयत्नांपैकी हे कार्य होते. सन 1823 मध्ये राममोहन यांनी 'हिंदू महिलांच्या हक्कांवर अतिक्रमण' या नावाने एक माहिती पुस्तिका लिहिली. त्यामध्ये त्यांनी अशी मागणी केली की, हिंदू स्त्रीला आपल्या वडिलांच्या व पतीच्या संपत्तीमधे अधिकार मिळाला पाहिजे. 1827 मध्ये त्यांनी मृत्युंजय या लेखकाच्या 'वज्रसूची' नामक संस्कृत निबंधाचे लेखन व संपादन केले. त्यात जातिव्यवस्थेवर त्यांनी प्रखर टीका केली.

# 4

## ख्रिश्चन मिशनऱ्यांबरोबर वादविवाद

1821 मध्ये युनिटेरियन असोसिएशनची स्थापना कलकत्ता येथे झाली. ह्या असोसिएशनचे स्फूर्तिस्थान होते राममोहन. इतकेच नव्हे तर संस्थेसाठी संपूर्ण वित्तसाहाय्यदेखील त्यांनी पुरवले. या संस्थेची ध्येयधोरणे राममोहन यांनीच निश्चित केलेली असून त्यात सर्वसामान्यांच्या उन्नतीचा विचार फार महत्त्वाचा होता. ह्या ध्येयधोरणांचा मसुदा म्हणजे एक महत्त्वाचा दस्तावेज असून सर्वसामान्यांच्या प्रश्नांचा ऊहापोह करून त्यांच्या समस्यापूर्तीसाठी घेतलेला पवित्रा हा आश्चर्य वाटावा इतका आधुनिक आहे. एक गोष्ट इथे प्रकर्षाने जाणवते, ती म्हणजे राममोहन यांची वैचारिक बैठक जरी आध्यात्मिक असली तरीही त्यांनी जीवनाच्या भौतिक आणि आर्थिक बाजूकडे मुळीच दुर्लक्ष केलेले नव्हते. (इतर काही लोकांप्रमाणे त्यांचे) काही तथाकथित आध्यात्मिक दृष्टिकोण असलेल्या लोकांसारखे त्यांच्याबाबतीत घडले नाही. राममोहन यांना सर्वसामान्य व्यक्तीच्या जीवनातील विविध पैलूंमध्ये अंगभूत असलेल्या एकतेची साकल्याने जाणीव होती. त्याचबरोबर 'मानवाची मुक्ती ही टप्प्याटप्प्याने होत नसून ती एक साकल्याने प्राप्त करायची गोष्ट आहे.' ह्या सत्याचे त्यांना योग्य आकलन झाले होते. युनिटेरियन असोसिएशनची ध्येये व उद्दिष्टे सांगताना ते लिहितात, ''ह्या असोसिएशनची उद्दिष्टे आणि कार्यक्षेत्राच्या व्याप्तीमध्ये खालील गोष्टी प्रामुख्याने येतात–

1) शिक्षण आणि त्यापासून मिळणाऱ्या फायद्यांचा प्रसार करणे. 2) अज्ञान, अंधश्रद्धा, कट्टरपणा व धर्म वेडेपणाचा अंत करणे. 3) बौद्धिक पातळी उंचावणे. 4) नैतिक तत्त्वांचे शुद्धीकरण करणे. 5) वैश्विक पातळीवर दयाळूपणा व परोपकाराची वृत्ती वृद्धिंगत करणे. 6) असंख्य स्थानिक रहिवाशांच्या स्वास्थ्य सुधारणेबरोबरच त्यांच्या शारीरिक सुधारणेकडे लक्ष पुरवणे. 7) लोकांमध्ये असलेल्या कला–कौशल्यांना अशा प्रकारे प्रोत्साहन देणे, की ज्यामुळे त्यांचे सामाजिक व घरगुती जीवन सुकर होईल. ह्या उपरोक्त उद्दिष्टांसाठी कायदेशीर पाठपुरावा ही या असोसिएशनची महत्त्वाची कार्यपद्धती आहे. पण अनुभवांती हे स्पष्ट झालेले आहे की, निसर्ग आणि समाजाच्या प्राथमिक गरजा पूर्ण झाल्यानंतरच उच्चकोटीची बुद्धिमत्ता, संपन्नता आणि धार्मिक नैतिकतेचे उन्नयन होण्याची अपेक्षा करता

येते.'' बंगालमधील श्रीरामपूर हे या काळात ख्रिश्चन धर्मगुरूंचे एक महत्त्वाचे केंद्र म्हणून नावाजले जात होते. ह्या धर्मगुरूंच्या गटामध्ये मोठमोठ्या विद्वान आणि कनवाळू लोकांचा समावेश होता. त्यांच्यापैकी रेव्ह. विल्यम कॅरीसारख्यांच्या मते बंगाल ह्या प्रांतांचे आपण खूप कृतज्ञ राहिले पाहिजे. पण हे लोक मूलत: धर्मपरिवर्तनाच्या कामासाठी नेमले गेले असल्याने पंथीय अभिनिवेषाने झपाटले होते. यामुळे त्यांचा हिंदुधर्मावर सतत प्रहार करण्याकडे कल असे आणि यातूनच आपल्या ज्ञानाचा उपयोग करण्याकडे त्यांचे दुर्लक्ष होत असे. 'ब्राह्मण सेवादी' ह्या बंगाली आणि ब्राह्मिनिकल मॅगझीन' ह्या इंग्रजी नियतकालिकातून राममोहन यांनी हिंदू एकीकरणवाद आणि वेदांतांबद्दल बचावात्मक बाजू मांडून श्रीरामपूर येथील मिशनऱ्यांच्या हल्ल्याची धार बोथट केली.

ख्रिश्चनांच्या त्रित्ववादाच्या सिद्धांतावर राममोहन यांनी कडाडून हल्ला चढवला. त्रित्ववादाच्या सिद्धांताला धरून एकीकडे राममोहन आणि त्यांचे मित्र रेव्ह. ॲडम यांच्यामध्ये तर दुसरीकडे रेव्ह. डॉ. रेलॅंड, लेफ्ट. व्हाईट यांच्यामध्ये फार मोठ्या प्रमाणावर वादविवाद होत. 'एशियाटिक जर्नल'मध्ये राममोहन यांनी एका मिशनऱ्याने मांडलेल्या त्रित्ववादाच्या गणितीय समर्थनाचे जोरदारपणे खंडन केले. ते लिहितात, ''काही काळापूर्वी मी देवाच्या त्रित्वाबद्दल असलेल्या गणिती विधानाचा उल्लेख वाचला तो असा —

'ज्याप्रमाणे तीन रेषाखंडांचा मिळून एक त्रिकोण होतो, त्याचप्रमाणे तीन तत्त्वांचे मिळून एक दैवत तयार होते.' मला आश्चर्य या गोष्टीचे वाटते की, सर आयझॅक न्यूटनसारख्या गणितात पारंगत असलेल्या विद्वानालासुद्धा असा सिद्धांत त्रित्ववादाच्या समर्थनार्थ सुचला नसेल जो 'या' लोकांनी मांडला. हा सिद्धांत अत्यंत सुयोग्य आहे असे त्रित्ववाद्यांना वाटत असले तरीही त्यात खालील त्रुटी प्रकर्षाने जाणवतात–

1) प्रथमत: त्रिकोणाच्या बाजूंची तुलना देवाच्या तीन विविध स्वरूपांशी करणे हेच मुळात विसंगत असून मूळ संकल्पनेपासून दूर जाणारे व केवळ काल्पनिक असे विधान ठरते. 2) दुसरे म्हणजे त्यांच्याच या विधानाने त्यांनीच मांडलेल्या देवाच्या एकतेच्या कल्पनेला बाध पोहोचतो. कारण देवाचे त्रिविध अस्तित्व (पिता, पुत्र व पवित्र आत्मा) जर त्रिकोणाच्या प्रत्येक बाजूशी निगडित असेल तर प्रत्येक स्वरूप हे एकक ठरते आणि मग एकतेचा सिद्धांत खंडित होतो. 3) तिसरे म्हणजे या गणिती सिद्धांतामुळे तीन दैवी अस्तित्वे नाकारली जातात आणि 'देव' हे विशेषण त्रिकोणाच्या प्रत्येक बाजूला लागू करता येत नाही. 4) हाच विचार हिंदूमध्ये जास्त प्रगल्भतेने दिसून येतो जेव्हा ते 'चतुर्भुज' देवाची संकल्पना मांडतात. 1820 ते 1823 दरम्यानच्या काळात राममोहन यांचे मिशनऱ्यांबरोबर बरेच प्रखर वादविवाद झाले. 1820 मध्ये राममोहन यांनी The Precepts of Jesus. The guide to peace and happiness (येशूच्या आज्ञा, शांती व सुखाचा मार्ग) ही पुस्तिका प्रकाशित केली आणि एकच खळबळ उडाली. या पुस्तिकेच्या प्रस्तावनेत त्यांनी नव्या



करारातील उपदेशाच्या विरोधात आपले मत प्रदर्शित केले. त्यांचा विशेष करून धर्मासंबंधीची कर्मठता, रहस्य आणि चमत्कार यांना विरोध होता. याचमुळे त्या काळचे एक मिशनरी रेव्ह. डेकार स्मिथ यांनी राममोहन यांच्यावर कडाडून टीका केली आणि त्यांचा 'एक धर्मद्वेष्टा' व 'सत्याची अप्रतिष्ठा करणारा' अशा कठोर शब्दांमध्ये उल्लेख केला. आपल्यावरील ह्या आरोपांचे खंडन करण्यासाठी व 'प्रिसेप्टस्'मधील स्वत:च्या विधानांच्या बचावासाठी राममोहन यांनी 'An Appeal to the Chrishian Public' नावाचा निबंध प्रसिद्ध केला. या निबंधाच्या विरोधी मतांचे प्रदर्शन डॉ. जोशुआ मार्शमन यांनी 'The Friend of India' या नियतकालिकात केले. याचे प्रत्युत्तर राममोहन यांनी The Second Appeal to the Christian Public' ह्या निबंधाद्वारे 1821 मध्ये दिले. मार्शमन यांनी पुन्हा एकदा आपली टीका 'The Friend of India'मध्ये प्रकाशित केली. याचे प्रत्युत्तरही राममोहन यांनी 1823 मध्ये 'Final Appeal to the Christian Public' ह्या आवाहनात्मक निबंधामध्ये दिले. चार दैवीशक्ती/अस्तित्वाचा भावनिक आविष्कार एकाच ठिकाणी अशा प्रकारे करणे म्हणजे 'संयुक्त देवाची' संकल्पना आयताकारात मांडण्यासारखे आहे. याची तुलना 'त्या त्रिकोणात्मक मांडणीबरोबर करता येते. या दोन्ही संकल्पना अतर्क्य आहेत ही चौथी बाब. 5) पाचवे आणि सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे अशा प्रकारची विधाने हिंदूंच्या अनेक एकेश्वरवादी मान्यतांसाठी उपयुक्त ठरतात, कारण हिंदूंच्या मान्यतेमध्ये 'देव एक आहे' म्हणताना त्याच्या असंख्य स्वरूपांची उपासना होत असते.''

'द प्रिसेप्ट्स ऑफ जीझस' ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत राममोहन यांनी असे लिहिले, ''न्यू टेस्टामेंटमधील इतर अनावश्यक गोष्टी बाजूला ठेवून जर नैतिकतेच्या संदर्भात दिलेल्या नीतिवचनांवर भर दिला तर मला असे आश्वासकरीत्या जाणवत आहे की, त्याचा सुयोग्य आणि इच्छित असा परिणाम लोकांची समज वृद्धिंगत होण्यासाठी होईल. मग ते लोक कोणत्याही संप्रदायाचे असोत वा धार्मिक मान्यतेचे असोत. कारण की मुक्तचिंतन करणारे व ख्रिस्तविरोधक यांच्या मनामध्ये संशय आणि विवाद उत्पन्न करणारा काही भाग हा त्या पुस्तकातील ऐतिहासिक माहिती सांगणाऱ्या काही उताऱ्यांत आहे. विशेषत: चमत्कारांशी संबंधित असलेले लिखाण. खरे म्हणजे आशियातील लोकांना प्रभावित करण्यासाठी रचलेल्या कपोलकथांपेक्षा हे लिखाण कमी चमत्कृतीपूर्ण असले तरीही मूळ संहितेचे वजन कमी करण्यास मदत करणारे असे आहे. याउलट मनुष्यप्राण्याच्या शांतता आणि सुसंवादित्वाची जपणूक करण्यासाठी उपयुक्त असलेले नैतिकतेचे जे सिद्धांत असतात ते विकृत अध्यात्माचा पुरस्कार करणाऱ्यांच्या आकलनकक्षेत येत नाहीत. पण असे सिद्धांत बुद्धिगम्य असल्यामुळे सुशिक्षित अथवा अशिक्षित अशा सर्वांना सारखेपणाने समजतात. धर्म व नैतिकतेची ही तत्त्वप्रणाली इतकी तोलून-मापून मांडली आहे की, तिचा मानवजातीच्या आदर्शाची उंची वाढविण्यास व 'देव' ह्या संकल्पनेच्या विचारांबाबत जास्तीत जास्त उदारपणा आणण्यास मदत होईल. ही तत्त्वप्रणाली मानवाच्या परस्पर

व्यवहारांमधील सहजता आणि समष्टी व व्यक्तींसाठी असलेल्या कर्तव्यांचे पालन करण्यासंदर्भातील वर्तन-विचारांवर अंकुश लावण्यासाठी सुयोग्य आहे. सध्यस्थितीत असलेल्या ह्या तत्त्वप्रणालीच्या प्रचाराचे सुयोग्य परिणाम मिळतील अशी मला आशा आहे.''

मिशनरी लोकांनी वेदांत आणि हिंदू एकात्मवादाच्या विरोधात सतत आक्रमक असे लिखाण छापून प्रसिद्ध करण्याचा सपाटा चालूच ठेवला. त्यामुळे या सगळ्यांना उत्तर देणे राममोहन यांना भाग पडले. त्यांनी या प्रकाराचा समर्थपणे समाचार घेतला. Brahminical Mag. No.4 ह्या नोव्हेंबर 1823 या अंकाच्या प्रस्तावनेत त्यांनी लिहिले, ''या नियतकालिकाच्या तिसऱ्या अंकात मी काही विनम्र सूचना केलेल्या असूनही मला या गोष्टीचे आश्चर्य वाटते की, धार्मिक विवादाच्या संदर्भात काही मिशनरी सद्गृहस्थांनी अपमानास्पद अशी वक्तव्ये प्रसिद्ध केली. मिशनरी लोकांनी नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या आणि वितरित केलेल्या माहिती पुस्तकांमधून वैदिक तत्त्वप्रणालीवर निरीश्वरवादाचा आरोप केला तसेच आमची त्या धर्माचे अनुयायी म्हणून अनुचित शब्दांमध्ये संभावना केली. या अयोग्य प्रकारामुळेच प्रेरित होऊन मी जवळपास चार वर्षांनंतर ह्या नियतकालिकाचा चौथा अंक प्रकाशित करत आहे. हिंदू धर्माची मूलतत्त्वे उदारमतवाद आणि वैश्विक सहनशीलता ही जगप्रसिद्ध आहेत. यामुळे ख्रिश्चनधर्माचाच काय कोणत्याही व्यवस्थेचा विरोध करणे हे माझ्या तत्त्वात बसत नाही. त्याचबरोबर ख्रिश्चन धर्मगुरू आणि विद्वानांबद्दल माझ्या मनातील आदरापोटी मी त्यांच्या चुका उघडकीस आणण्याचा विचारसुद्धा केला नसता. पण या ख्रिश्चन लेखकांनी विवेकहीन पद्धतीने हिंदू धर्माचा अपमान केल्याचे माझ्या निदर्शनास आल्याने त्यांनी टीका करण्यास मला भाग पाडले आहे. असे असले तरीही दोन्ही धर्मांच्या तौलनिक गुणवत्तेची सूक्ष्मतर चिकित्सा करणे मी आनंदाने स्वीकारीन. ख्रिश्चन लेखकांनी जर ह्या वादविवादामध्ये सौम्य व सन्मानपूर्ण भाषा वापरली अथवा साहित्यिक गुणविशेषांनी युक्त अशी भाषा वापरली आणि सत्याचे अन्वेषण अभ्यासपूर्ण पद्धतीने केले तर माझा आनंद द्विगुणित होईल.''

राममोहन यांनी त्रित्ववादावर मांडलेल्या विचारांवर खात्री पटवून देण्याजोगी विधाने करता न आल्याने डॉ. मार्शमन यांनी अयोग्य आणि चुकीच्या पद्धतीने हिंदू धर्मावर हल्ला चढवला. ''असत्य आणि खोटारडेपणा हा हिंदुत्वाचा पाया आहे,'' असे मत मार्शमन यांनी मांडले. त्याला उत्तर देताना राममोहन लिहितात, ''आपण सर्वजण एका गंभीर स्वरूपाच्या धार्मिक चर्चेत सहभागी होत असून एकमेकांना केवळ शिव्याशाप देणे हा आपला उद्देश नाही, हे सतत लक्षात ठेवले पाहिजे.'' ख्रिश्चियन मिशनरी व राममोहन यांच्यातील वादविवादाच्या बाबतीत राममोहन यांचा संदर्भ देऊन 'इंडिया गॅझेट'च्या संपादकांनी असे लिहिले आहे, ''(राममोहन यांची) कुशाग्रबुद्धीचा वापर, अकाट्य तर्कबुद्धी व शांतपणाने विधानं करण्याची क्षमता ही केवळ अद्वितीयच आहे.''



राममोहन यांनी वादविवादामध्ये इतका उच्च दर्जा नेहमीच टिकवून ठेवला होता. त्यांच्यात असलेली विनम्रतेची भावना त्यांना एका विशिष्ट उंचीवर नेऊन ठेवत असे. प्रतिस्पर्ध्यांच्या बाबतीत त्यांच्या मनात निकोप व मोकळेपणाची भावना असे. त्यांचा तोल कधीच ढळत नसे, अगदी कोणी अपशब्द वापरले तरीही. कारण असे अपशब्द त्यांना अनेक वेळा मिशनरी आणि कट्टरपंथी हिंदुत्ववाद्यांकडून आपल्या अनेक वर्षांच्या त्यांच्याशी झालेल्या विवादात्मक संघर्षात ऐकावे लागले होते. त्यांनी लिहिलेल्या व उच्चारलेल्या प्रत्येक शब्दात बुद्धिप्रामाण्यवाद, वैश्विकता आणि परोपकाराचे स्वर उमटत असत.

निखळ सत्यनिष्ठा हा राममोहन यांचा अजून एक वाखाणण्याजोगा गुण होता. मिशनऱ्यांबरोबर एकदा असाच वादविवाद सुरू असताना असा प्रश्न उपस्थित झाला की, मूळ बायबल ज्यांनी वाचलेच नाही त्या राममोहन यांना चर्चेचा अधिकार कसा प्राप्त होईल? राममोहन यांनी हा आरोप लगेच मान्य केला. त्यानंतर त्यांनी मूळ बायबलच्या अभ्यासासाठी दोन वर्षे घालवली. लॅटिन, ग्रीक आणि हिब्रू ह्या भाषा शिकून घेतल्या आणि या काळात त्यांनी चर्चेत भाग घेतला नाही. त्यांच्या एका विधानावरून हे स्पष्ट होते, ''ह्या अभ्यासाने मला जवळपास दोन वर्षांनंतर ब्राह्मीनिकल मॅगझीनचा चौथा अंक काढण्यासाठी प्रवृत्त केले.''

राममोहन यांनी सुरू केलेल्या नवजागरणामुळे अनेक लोक त्यांच्या विचारांचे चाहते बनले. त्यापैकीच एक श्री. राखलदास हलदर यांनी आपल्या 'इंडिया डायरी'मध्ये 19 जुलै 1852 रोजी अशी नोंद केली, ''आज माझी एका ज्यू वंशाच्या व्यक्तीची भेट झाली. तो म्हणाला की, त्याच्या मामांकडून थोर राममोहन रॉय हिब्रू भाषा शिकले, कारण त्यांना मूळ बायबलचा अभ्यास करावयाचा होता. ब्राह्मीनिकल मॅगझीन – अंक-4' मध्ये 15 नोव्हेंबर 1823 रोजी राममोहन यांनी शिवप्रसाद शर्मा ह्या टोपण नावाने एक लेख लिहिला. त्याचे शीर्षक होते 'ख्रिश्चन धर्मतत्त्व नाकारण्यासाठी एका हिंदूने दिलेली कारणे.' या लेखामध्ये त्यांनी 'त्रित्ववाद' आणि 'येशूच्या प्रायश्चित्ता'बाबतच्या समस्यांचे विवेचन केले. ह्या दोन संकल्पना ख्रिश्चन धर्माच्या अभिन्न घटक आहेत. पण राममोहन यांनी आपल्या नेहमीच्या प्रभावी तर्कसंगत विश्लेषणाद्वारे या दोन्ही गोष्टी तर्काच्या कसोटींवर कशा टिकत नाहीत, हे दाखवून दिले.

एककडे त्रित्ववादाचा धर्मसिद्धांत आणि येशूचे प्रायश्चित्त ह्या गोष्टी ठामपणे नाकारत असतानाच राममोहन यांनी मिशनऱ्यांनी हिंदुत्वाच्या विरोधासाठी केलेल्या असभ्य हल्ल्याचे सभ्यपणाने उत्तर दिले आणि वेदांताची शिकवण कशी महान आणि परमोच्च आहे हे ठामपणे सांगितले. आपल्या 'प्रिसेप्ट्स ऑफ जीझस, गाइड टू पीस अँन्ड हॅपीनेस'च्या प्रस्तावनेत ते लिहितात, ''(मिशनऱ्यांचे असे वागणे योग्य नाही) व या कारणांमुळेच मी आता त्या संदर्भात कोणत्याही विवादात सहभागी होऊ इच्छित नाही. सध्यातरी मी माझे

लक्ष येशूच्या पवित्र वचनांचे इंग्रजीमधून संस्कृत आणि बंगालीमध्ये भाषांतर करण्यावर केंद्रित करणार आहे ज्याचा फायदा माझ्या मित्रांना होईल.''

मिशनऱ्यांबरोबर झालेल्या राममोहन यांच्या वादविवादाची फलश्रुती अनपेक्षितरीत्या झाली. रेव्ह. विल्यम ॲडम हे एक बॅप्टीस्ट मिशनरी होते. राममोहन यांचे युनिटेरियानिजम-बद्दलचे आणि त्रित्ववादाच्या विरोधातले विचार योग्य आणि अचूक असल्याची श्री. ॲडम यांना खात्री पटली होती. श्री. ॲडम यांनी जाहीरपणे त्रित्ववादाचा त्याग करून युनिटेरियन ख्रिश्चॅनिटीचा पुरस्कार केला. यामुळे कलकत्त्यात राहणाऱ्या युरोपीय समाजामध्ये प्रक्षोभाची लाट उसळली. लोक श्री. ॲडमचा उल्लेख Second fallen Adam अशा निंदाजनक शब्दांत करू लागले. ह्या प्रक्षोभाचा प्रभाव इतका वाढला की, कलकत्त्याचे तत्कालीन बिशप यांनी ॲडम यांना भारतातून हद्पार केले. पण ह्या प्रकरणात बिशप महाशयांना पराभव पत्करावा लागला. त्यांना इंग्लंडमधील ॲटर्नींनी जनरल यांनी ठणकावले की, त्यांनी ॲडमवर बजावलेली कार्यवाही अनुचित होती. ॲटर्नींनी बजावले की, पुरातनवादी ख्रिश्चन धर्म सोडून जाणाऱ्यांवर धर्मगुरूंनी मन मानेल अशी कार्यवाही करण्याचा काळ निघून गेला आहे.

श्रीरामपूर येथील मिशनऱ्यांनी 'द फ्रेंड ऑफ इंडिया' ह्या नियतकालिकाच्या 20व्या अंकामध्ये एक लेख प्रकाशित केला. त्या लेखाचा उद्देश होता येशूचा उपदेश व त्याची महत्ता वर्णन करणे आणि ख्रिश्चन धर्मग्रंथामधील धार्मिक निर्बंधांना चुकीचे ठरवणे. वास्तविकता अशी होती की, हा लेख एका मिशनऱ्याने जरी लिहिलेला असला तरीही मिशनऱ्यांना शोभणार नाही अशा विषाक्त भाषेत त्यांनी राममोहन यांच्या बाबतीत लिहिले होते. मिशनऱ्यांनी केलेल्या ह्या अविवेकपूर्ण द्वेषाच्या आणि क्रोधाच्या प्रदर्शनाला राममोहन यांनी 1820 मध्ये 'An Appeal to the Christian Public' मध्ये उत्तर दिले. हे प्रसिद्धिपत्रक म्हणजे राममोहन यांच्या तर्कसंगत, विश्लेषणात्मक निष्कर्ष आणि उच्च विचारसरणीचा अजोड नमुना आहे.

राममोहन लिहितात, "The friend of India"च्या विसाव्या अंकाचे वाचन करत असताना त्यात 'एक ख्रिश्चन मिशनरी' ह्या नावाने एका सद्गृहस्थाने माझ्या 'प्रिसेप्ट्स ऑफ जीझस' ह्या पुस्तकाबाबत आपल्या नोंदी दिलेल्या वाचण्यात आल्या आणि मी जेव्हढा आश्चर्यचकित झालो तेवढाच निराशही झालो. याच अंकाच्या संपादक महाशयांनी देखील त्याच प्रकारची टीका केलेली होती. मी केलेल्या कार्याबद्दल त्यांनी जी नापसंती नोंदवली आहे तिचा आधार काय आहे – अशी मला चौकशी करावयाची आहे. पण तत्पूर्वी संपादक महाशयांनी ज्या असंस्कृतपणे व ख्रिश्चनांना शोभणार नाही अशा पद्धतीने माझ्यावर व्यक्तिगत टीका करून अगदी 'रानटी, धर्मद्वेष्टा' असे शब्द माझ्यासाठी योजलेले आहेत त्याकडे लोकांनी लक्ष द्यावे असे मी विनम्र आवाहन करतो. 'त्यांचे



लेखन ख्रिश्चनांना न शोभणारे असे आहे' असे मी यासाठी म्हणालो की, माझा 'heathen' असा उल्लेख करून त्यांनी ख्रिश्चन धर्माच्या सत्य, परोपकार व उदारता ह्या तीन मूलभूत तत्त्वांचे उल्लंघन केले आहे. मला वाटते, नव्या करारामधील केवळ नैतिक शिकवण असलेला भाग बाजूला काढून 'ए गाईड टू पीस अँड हॅपीनेस' ह्या शीर्षकाखाली मी 'प्रिसेप्ट्स ऑफ जीझस'मधे छापला काय अथवा 'मी प्रिसेप्ट्स' या पुस्तकाची शैली धर्म व नैतिकतेच्या नियमावलीप्रमाणे केली काय, पण इतक्यानेच ह्या पुस्तकाचे समीक्षक आणि 'द फ्रेंड ऑफ इंडिया'चे संपादक यांनी माझ्यावर हिदेनिझमचा आरोप करावा, मला रानटी संस्कृतीचा पाईक म्हणावे, ही काही न्याय्य गोष्ट होत नाही. मी अजूनही ईश्वराला ह्या जगाचा निर्माता-पालनकर्ता मानत असून नव्या करारामधील वेचक भाग हा मानवाने संपूर्ण मानव जातीच्या भल्यासाठी पार पाडावयाच्या कर्तव्यांची जाणीव करून देणारा आहे, असे मानतो.''

राममोहन यांनी नव्या करारामधील धर्मबंधने व विचारप्रवाह हे येशूच्या नैतिक उपदेशांपासून वेगळे करण्याचा प्रयत्न केला. येशूचा संदेश हा विश्वातील समस्त मानव जातीसाठी असून याउलट ख्रिश्चन धर्मसंस्था (चर्च) व ह्या संस्थांनी पुरस्कृत केलेले मतप्रवाह आणि धार्मिक निर्बंध हे येशूच्या उपदेशाचा स्वीकार करणाऱ्यांसाठी फार मोठे अडसर आहेत, असे ठाम मत राममोहन यांनी व्यक्त केले. पण ख्रिश्चन मिशनऱ्यांनी मात्र राममोहन यांना अशा प्रकारचे विचार मांडून त्यांनी पाप केले आहे, असे म्हटले. मिशनऱ्यांनी राममोहन यांना 'सत्याचा अवमान करणारा' अशी पदवी बहाल केली. राममोहन यांनी आपल्या आवाहनाच्या शेवटी खालील चिरस्मरणीय शब्दांची योजना केली, ''अखिल मानव समाजामधील आपापसातील भेदाभेद व द्वेषभावना नष्ट करणारा आणि मानवजातीला ऐक्य व शांती जगण्यासाठी पोषक ठरणारा असा एखादा धर्म ईश्वरानेच आपल्याला बक्षीस म्हणून द्यावा, अशी मी त्याच्या चरणी प्रार्थना करतो.'' राममोहन यांच्या या शब्दांमध्येच त्यांनी नंतर स्थापन् केलेल्या वैश्विक धर्माचा बीजरूपाने प्रारंभ झालेला दिसून येतो. या पुस्तकात राममोहन यांनी ज्या पद्धतीने त्रित्ववाद, येशूचे प्रायश्चित इ. गोष्टींवर टीकात्मक लिखाण केले आहे त्यावरून त्यांच्या ख्रिश्चन धर्मग्रंथांच्या सखोल अभ्यासाची कल्पना येते. ह्या ज्ञानाच्या जोरावरच त्यांनी क्षुद्र आणि स्वार्थप्रेरित मिशनऱ्यांनी हिंदू धर्म व वेदांतावर केलेल्या आक्रमणास समर्थपणे तोंड दिले.

राममोहन यांच्यावर ख्रिश्चन मिशनऱ्यांनी भारतात जरी असभ्यपणाने हल्ले केलेले असले तरी त्यांच्या लिखाणाचे युरोप आणि अमेरिकेत फार मोठ्या प्रमाणात स्वागत झाले. 1816 मध्ये त्यांनी वेदांताच्या इंग्रजी अनुवादाचे प्रकाशन केले. त्या पुस्तकावर अनेक स्तुतीपर लेख व परीक्षणे इंग्लंड व युरोप खंडात वेगवेगळ्या वर्तमानपत्रांमधून प्रसिद्ध झाली. The monthly Repository of Theology and General Literature ह्या नियतकालिकाने राममोहन यांच्या वेदांतांवरील इंग्रजी निबंधांचे परीक्षण प्रसिद्ध केले.

''राममोहन रॉय नावाच्या एका हिंदू ब्राह्मण अभ्यासकाने या वर्षी एक पुस्तिका प्रसिद्ध केली आहे. कलकत्ता येथे प्रकाशित झालेल्या ह्या पुस्तकाचे नाव 'An Abridgement of Vedanta' असे असून हे पुस्तक म्हणजे अनेक विषयांवर असलेल्या वेदांमधील महत्त्वाच्या मजकुराचे संकलन असून प्राकृत धर्माची तत्त्वे मोठ्या समजूतदार व भारदस्तपणाने त्यात मांडली आहेत. ह्या धर्ममध्ये सर्वांची, अगदी क्षुद्र प्राण्यांचीही पूजा सांगितली असून त्याचबरोबर वेगवेगळे संस्कार, सण, ऋतू आणि त्यांच्याशी निगडित असलेले आहार-नियम यांची सविस्तर चर्चा त्यात आढळते. ईश्वराचे उपासक आणि ज्ञानी लोक कदाचित ह्या धर्माकडे 'एक परिपूर्णधर्म' म्हणून पाहू शकतील व कदाचित या धर्माची ज़ास्त दखलही ते घेणार नाहीत.'' ब्लॉईसचे धर्मगुरू अँबे ग्रेगोरी यांनी आपल्या फ्रेंच भाषेत लिहिलेल्या एका पत्रकात राममोहन यांचा एक मजेदार उल्लेख केला आहे ''राममोहन दर सहा महिन्यांनी एक लेख बंगाली व इंग्रजीमध्ये प्रकाशित करतात. त्या लेखाद्वारे त्यांनी आपली स्वत:ची अस्तिकवादाची एक प्रणाली विकसित केली आहे. ते स्वत: अत्यंत बुद्धिवान व तत्त्वज्ञानाचे गाढे अभ्यासक असून त्यांना वादविवादामध्ये विशेष रुची आहे. राममोहन हे सर्वसाधारणपणे विधाने करण्याऐवजी तर्कसंगती व कार्यकारणभावाचा वापर करून आपली विधाने इतरांपासून भिन्न असल्याचे सिद्ध करतात. याच तर्कसंगत पद्धतीने राममोहन हे सिद्ध करतात की, हिंदू तत्त्वज्ञानाच्या तोडीचे तत्त्वज्ञान इतर कोणत्याही युरोपियन ग्रंथांमध्ये सापडत नाही.''

कलकत्त्याला असताना राममोहन यांनी लंडनमध्ये असलेल्या रेव्ह. डॉ. टी. रेस यांना 4 जून 1824 रोजी एक पत्र लिहिले होते. ते पत्र याप्रमाणे आहे,

''रेव्हरंड महाशय, आपले पत्र मिळाले. त्याचबरोबर आपण पाठविलेले पुस्तकांचे पार्सलही मिळाले. मला खूप समाधान वाटले. आपल्या समितीने माझ्या 'The Precept of Jesus' ह्या संकलनाबरोबरच मी लिहिलेली दोन आवाहने पुनर्मुद्रित करण्याचा निर्णय घेतला आहे. यामुळे मी निश्चितच गौरवान्वित झालो असून ह्या सन्मानाचा तुम्ही माझ्यावर जणू वर्षावच केला आहे. माझी आपणास विनंती आहे की, माझ्या भावना समितीच्या इतर सदस्यांपर्यंत पोहोचत्या करून मला उपकृत करावे... खरंच, मला माझा आनंद व्यक्त करण्यासाठी शब्द अपुरे पडत आहेत. रोमन साम्राज्याच्या अधिपत्याखाली ख्रिस्ती धर्माची व येशूच्या नीतिवचनांची पायमल्ली झाली. या राजांनी ख्रिस्ती धर्माला वेडगळ आणि रानटी/असंस्कृत, विकृत अशा कार्यकलापांमध्ये जखडून टाकले होते. त्या मूळच्या शुद्ध, साध्या, सरळ व प्रत्यक्ष जीवनाभिमुख अशा ख्रिस्ती धर्माला अशा जोखडांपासून मुक्त करण्यासाठी माझ्या अनेक मित्रांनी, जे इंग्लंड व अमेरिकेत आहेत, जे सत्याचे पुरस्कर्ते आहेत, जे प्रयत्न सुरू केले त्याबद्दल मला अत्यंत आनंद होत आहे. अशा लोकांच्या कार्याच्या यशाची तुलना केवळ ल्युथर व त्यांच्या सहकाऱ्यांच्या यशाबरोबर करता येईल. कारण ह्या लोकांनी ख्रिस्ती धर्माच्या जागतिक इतिहासात सुधारणेचा पहिला मैलाचा दगड रोवला होता.



''दैवी अधिकार हा मानवनिर्मित सिद्धांतापेक्षा वेगळा आणि वरचढ असतो. त्याचबरोबर ह्या लोकांनी हे देखील सिद्ध केले की, परोपकाराची भावना आणि तिच्या व्यक्तिगत जीवनातील निर्वाह हा बाह्य अवडंबरांपेक्षा कधीही श्रेष्ठ असतो.''

राममोहन यांचे ख्रिश्चन धर्म व वेदांतांवरील लिखाण अमेरिकेतील थोरोसारख्या विद्वानांच्या वाचण्यात आले. थोरोसारख्या अनेक गूढवादी विद्वानांना या लिखाणाने प्रेरणा दिली. याचा प्रभाव असा झाला की, 'रॉयवादी' ह्या नावाने एका विचारकुलाची स्थापना झाली. याच कुलाचे एक अनुयायी श्री. मॉक्युर डॅनियल कोनवे यांनी 'The Open Court' नियतकालिकात 1894 साली असे लिहिले, 'ब्रिटिश व फॉरेन युनिटेरियन असोसिएशन'च्या निर्मितीमागे केवळ राममोहन रॉय हेच कारणीभूत आहेत. काही हिंदू निष्ठावंतांनी ईश्वरवादाची चळवळ सुरू केली. मद्रास येथे राहणाऱ्या काहींनी ह्या संदर्भात फॉक्स महाशयांशी संपर्क साधला. सप्टेंबर 1820 मध्ये पार्लमेंट कोर्टाने मद्रास येथे राहणाऱ्या ईश्वरवाद्यांना पाच गीनिज इतकी रक्कम दिली, तर 1824 मध्ये याच कोर्टाने अँग्लो-इंडियन युनिटेरियन चॅपेल कलकत्ता येथे बांधण्यासाठी वीस पौंडाची देणगी दिली.

ह्या घटना व राममोहन यांच्या भाषांतरित केलेल्या हिंदू धार्मिक कविता यांचा एकत्रित परिणाम असा झाला की, श्री. फॉक्स यांच्या मनात युनिटेरियानिजम पेक्षाही वरचढ असे वैश्विक एकतेचे विचार येऊ लागले,.... (राममोहन रॉय) हा एक असा हिंदू तत्त्वचिंतक आणि विचारवंत होता की ज्याच्या तोडीची अशी एकही व्यक्ती ख्रिस्ती धर्मात सापडणार नाही. केवळ राममोहन यांच्यामुळेच पौर्वात्य देशांमधील पाश्चात्त्य सभ्यतेच्या संदर्भात प्रतिक्रिया येणे सुरू झाले. ह्या प्रतिक्रियादेखील उपयुक्त ठरल्या. जेव्हा 25 मे 1831 रोजी असोसिएशनचा सहावा वर्धापन दिन साऊथ प्लेस चॅपेलमध्ये साजरा झाला, राजा राममोहन रॉय यांचे अगदी वेळेवर शुभागमन झाले. उपस्थितांमधील अनेक मान्यवर व्यक्तींमध्ये युनिटेरियन असोसिएशनच्या फ्रान्स व ट्रान्सिल्व्हानियामधील शाखांचे प्रतिनिधी तर होतेच शिवाय हॉवर्ड विद्यापीठाचे अध्यक्ष डॉ. कीर्कलँड हेदेखील आवर्जून उपस्थित होते. राममोहन यांचे त्या सर्वांसमोर भाषण झाले. ह्या संक्षिप्त आणि तरीही विचारांनी ओतप्रोत भरलेल्या भाषणाने सर्वजण भारावून गेले. राममोहन यांनी आपल्या व्यक्तिमत्त्वाने श्रोतृसमुदायामध्ये एक प्रकारचे चैतन्य निर्माण केले.

हिंदूमधील चुकीचे धार्मिक निर्बंध आणि भरकटलेल्या विचारप्रवाहांवर राममोहन यांचे टीकास्त्र चालूच होते, हे विसरून चालणार नाही. विशेषत: अशा चालीरीतींवर ज्यांच्यामुळे ह्या धर्माची बदनामी झाली. राममोहन यांनी कडाडून प्रहार केले. वेदांत आणि हिंदू धर्माचा ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या हल्ल्यापासून केवळ बचाव करण्यासाठी हिंदूंच्या सगळ्याच विचारी व अविचारी वागण्याचे तसेच विकृत मनोवृत्तीचे समर्थन काही जण करीत होते. पण राममोहन यांचा समावेश अशा संधिसाधू लोकांमध्ये नव्हता. धार्मिक समस्या सोडवत असताना पक्षपातीपणाने विचार न करता त्या धर्माच्या मूलतत्त्वांचा व सत्याचा अभ्यास करणे हे राममोहन यांचे वैशिष्ट्य होते. हिंदू धर्मातील सर्वोत्तम आणि विश्वव्यापी विचारांना

दूषित करणाऱ्या काही धार्मिक आचारविचारांचे राममोहन यांनी जोरदारपणे खंडन केले पण त्याचबरोबर त्यांनी आपला संयम आणि समजूतदार वैचारिक थोरवीचा त्याग केला नाही. हिंदूंच्या उच्च विचारांचे समर्थन करताना त्यांनी ह्या धर्मातील बाधक अपप्रवृत्तींचे खोटा अभिनिवेश धरून समर्थन केले नाही. राममोहन यांनी एका वैश्विक धर्माचा ध्यास घेतला होता. हिंदू, बौद्ध, इस्लाम आणि ख्रिश्चन ह्या चार जागतिक धर्मांचा तौलनिक अभ्यास करणारे राममोहन हे पहिले तत्त्वचिंतक होते. ह्या चारही धर्मांच्या मूलतत्त्वांमध्ये विलक्षण साम्य असल्याचे त्यांना जाणवले होते. जगातील सर्व धर्मांबद्दल त्यांची भूमिका केवळ समन्वयवादी नसून संश्लेषणात्मक होती. प्रोफेसर मोनिअर विल्यम्स यांनी राममोहन यांचे वर्णन 'धर्माच्या तौलनिक अभ्यासाचा जनक' या शब्दांत केले, तर मॅक्समुलर यांच्या मते पौर्वात्य व पाश्चिमात्य विचारांचा समन्वय साधणाऱ्यांमध्ये राममोहन हे सर्वप्रथम होत. वैश्विक सुसंवाद स्थापन करण्यासाठी ह्या जगातील सर्व धर्मांना एकत्र आणण्यासाठी सुधारणेची गरज आहे, अशी प्रचिती राममोहन यांना आली होती. डॉ. ब्रजेंद्रनाथ सील यांनी राममोहन यांच्या विचार आणि कार्याविषयी एका उत्कृष्ट भाषणात स्पष्टपणे म्हटले आहे की, 'राममोहन हे खऱ्या अर्थाने आधुनिक भारताचे अग्रदूत आणि जनक आहेत.'

ह्या संदर्भात राममोहन यांचे कलकत्ता येथील एक सहकारी रेव्ह. विल्यम ॲडम ह्यांचे राममोहनांच्या बाबतीत काढलेले प्रशंसोद्‌गार वाचण्यासारखे आहेत. 'राममोहन म्हणजे स्वातंत्र्याने जगेन नसता मरून जाईन', मुक्त वातावरणातच श्वास घ्यायचा आणि तसे जर नसेल तर तसे वातावरण निर्माण करायचे. – अश विचारांचा माणूस. एका इंग्रजी कवीच्या मताप्रमाणे, ''माझे मन हेच माझे साम्राज्य'' अशी त्यांच्या मनाची अवस्था होती. अशा उन्मुक्त आणि स्वतंत्र विचारांच्या जोरावरच राममोहन त्या काळच्या आध्यात्मिक, सामाजिक, राजकीय दबावाविरुद्ध बोलू शकले.'

वस्तुस्थिती तर ही होती की, राममोहन स्वत: त्या सामाजिक, राजकीय अथवा आध्यात्मिक दबावाचे एक अभिन्न घटक होते. मग परिस्थितीवश कधी शोषकाच्या भूमिकेत असतील तर कधी शोषिताच्या, किंवा कधी धर्मगुरू तर कधी ह्या व्यवस्थेचा बळी ठरलेल्याच्या भूमिकेत. पण त्यांचे मोठेपण जर कशात असेल तर ते म्हणजे कोणत्याही परिस्थितीत त्यांनी ह्या आध्यात्मिक व सामाजिक क्षेत्रात विकृत अधिकार मिरवणाऱ्यांच्या प्रवृत्तींच्या विरोधात बोलणे सोडले नाही.

राममोहन हे संपूर्ण स्वातंत्र्याचे भोक्ते होते. त्यांना केवळ भौतिक पातळीवर स्वातंत्र्य अपेक्षित नसून बुद्धीचे स्वातंत्र्य, कृतीचे स्वातंत्र्य व विचारांचे स्वातंत्र्य अपेक्षित होते. राममोहन यांनी आपल्याच लोकांनी, आपल्याच देशातील रीतीरिवाजांनी, पूर्वजांनी, कुटुंबातील सदस्यांनी आणि स्वत:च्याच व्यक्तिगत प्रतिष्ठेने त्यांच्या पायात घातलेल्या सर्व बेड्या, अगदी अंत:प्रेरणेने तोडून पायदळी तुडवल्या. स्वत: स्वीकारलेल्या मार्गामध्ये



आलेल्या प्रत्येक संकटावर त्यांनी मात केली. आपल्या वैचारिक स्वातंत्र्यावर थोडाजरी कोणी घाला घातल्याचे लक्षात येताच राममोहन पूर्ण शक्तीनिशी असा हल्ला परतवून लावत असत, कारण असा हल्ला होणे हा त्यांना अत्यंत अवमान वाटत असे. व्यक्ति-स्वातंत्र्य व वैचारिक स्वातंत्र्य जपण्याच्या बाबतीत ते फारच दक्ष आणि संवेदनशील होते. पण त्याचबरोबर आपल्या बाबतीत विरोधकांचाही त्यांच्यावर प्रचार करण्याचा समान अधिकार त्यांनी मान्य केला होता. राममोहन यांच्या वैचारिक स्वातंत्र्यावर प्रहार करणारे अनेक होते. यात वेगवेगळ्या धार्मिक मान्यता असलेले आणि राजकीय व सामाजिक, वैचारिक भिन्नता असलेले असेही लोक होते. पण त्या सर्वांचा राममोहन यांनी सन्मानच केला. वैचारिक स्वातंत्र्य हे राममोहन यांचे व्यवच्छेदक लक्षण होते. त्यांच्या स्वभावामध्ये एक प्रकारची तर्कसंगत अशी बांधिलकी होती. परमोच्च उद्दिष्टांमध्ये असलेल्या त्यांच्या दृढ विश्वासाचा तो परिपाक होता. अशा प्रकारची बांधिलकी आत्मसंयम आणि सुनियंत्रित स्वातंत्र्याच्या मोबदल्यात व्यक्ती आणि समाजाला प्राप्त होते. ह्या स्वातंत्र्यामुळे प्राप्त होणारा आनंद राममोहन यांनी कोणत्याही वर्ग, वर्ण, वंश अथवा कोणत्याही देशाच्या नागरिकासाठी मर्यादित ठेवला नसून सर्वांवर त्याची मुक्त उधळण केली. त्यांनी आपल्या संवेदनेच्या कवेत संपूर्ण मानवजातीला सामावून घेतले होते.''

# 5

## शैक्षणिक सुधारणा

ज्या युगानुयुगाच्या अविद्येच्या निद्रेत भारतीय समाज घोरत पडला होता, त्याला जागे करण्यासाठी शिक्षण व्यवस्थेमध्ये आमूलाग्र बदल घडवून आणणे अत्यंत आवश्यक होते, ही गोष्ट राममोहन यांच्या लक्षात आली होती. संपूर्ण शिक्षण व्यवस्थेची पुनर्बांधणी आवश्यक होती. बुद्धिनिष्ठ व वैज्ञानिक शिक्षणाची भारतामध्ये गरज होती जेणेकरून वैश्विक पातळीवर भारताला आपले पूर्वपद प्राप्त करता येणार होते. जेव्हा कंपनी सरकारने संस्कृत पंडितांच्या देखरेखीखाली चालणाऱ्या संस्कृत पाठशाळा स्थापन करून ज्ञानदानाचा निर्णय घेतला तेव्हा राममोहन यांनी त्या निर्णयाला विरोध केला. भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र, गणित इ.सारखे मूलभूत विज्ञानाचे विषय शिकवणे आवश्यक आहे, असे त्यांचे मत होते. गव्हर्नर जनरल श्री. अॅमर्हस्ट यांना उद्देशून 11 डिसेंबर 1823 रोजी लिहिलेल्या एका पत्रात राममोहन लिहितात, ‘‘सरकारने संस्कृत पाठशाळांची स्थापना करून तेथे हिंदू पंडितांना ज्ञानदानासाठी नियुक्त केलेले आहे. पण अशा प्रकारच्या पाठशाळा सध्याही ह्या देशात प्रचलित आहेत. अशा प्रकारच्या गुरुकुल पाठशाळा (थोड्याफार फरकाने लॉर्ड बेकनच्या पूर्वीच्या कालखंडामध्ये युरोपात अशाच पाठशाळा होत्या) केवळ बोजड असे आध्यात्मिक व व्याकरणातील बारकावे समजावून देणारे शिक्षण देतात. अशा शिक्षणाचा युवकांना प्रत्यक्ष जीवनात काहीच उपयोग नाही. विशेषत: समाजाला तर नाहीच नाही. त्या ठिकाणी (पाठशाळेत) शिक्षण घेणारे विद्यार्थी तेच शिकतील जे हजार–दोन हजार वर्षांपूर्वी शिकवले जात होते आणि ज्या ज्ञानामध्ये आतापर्यंत अनेक तत्त्ववेत्यांनी आपल्या परीने निरर्थक, पोकळ अशी भर घातली आहे. हा भारतातील शिक्षणाचा सर्वमान्य प्रकार आहे. इंग्लंडमध्ये काय घडले ते पाहू. लॉर्ड बेकनचा उदय होण्यापूर्वी त्या देशात इथल्यासारखीच परिस्थिती होती. तेथील शिक्षण-विषयक धोरण हे अज्ञानमूलक होते. ‘लोकांनी शहाणे होऊ नये,’ हा दृष्टिकोन होता. केवळ लॉर्ड बेकनने आपल्या तत्त्वज्ञानाच्या जोरावर देशाला जर ज्ञानाचा मार्ग दाखवला नसता तर इंग्लंड अजूनही अज्ञानाच्या अंधकारात खितपत पडले असते. अशाच पद्धतीने भारतातही संस्कृत शिक्षणप्रणाली ह्या देशाला अज्ञानाच्या अंधकारात ठेवण्यासाठी कारणीभूत



ठरणार आहे. ब्रिटिश कायदेमंडळाचे हेच उद्दिष्ट असेल तर गोष्ट वेगळी. पण सरकारचा जर इथल्या लोकांचा विकास करण्याचे उद्दिष्ट असेल तर ते निश्चितच अधिक उदार आणि ज्ञानदानाच्या प्रगत पद्धतीचा अवलंब करतील. या पद्धतीत गणित, मूलभूत तत्त्वज्ञान, रसायनशास्त्र आणि शरीरशास्त्राबरोबरच इतर उपयुक्त विज्ञान विषयांचा समावेश असेल. आणि या कामासाठी युरोपात शिक्षण घेतलेल्या प्रतिभासंपन्न शिक्षकांच्या नेमणुका कराव्या लागतील आणि त्यांना सुसज्ज महाविद्यालये, उत्तम ग्रंथसंपदा अणि इतर साधनेही पुरवावी लागतील.’’

भारताच्या राजधानीत राहणारे बिशप हेबर यांनी हे पत्र लॉर्ड अमर्हस्ट यांच्या हातात दिले. सामाजिक सुधारणा व शिक्षणखात्याच्या सर्वसाधारण समितीचे अध्यक्ष श्री. जे. एच. हॅरीसन यांच्याकडे हे पत्र गेले असता त्यांनी त्या पत्रावर, "Entitled to no reply", (उत्तर देण्याच्या लायकीचे नाही), अशी टीप लिहून ठेवली. लॉर्ड रिपन यांनी 1882 मध्ये नियुक्त केलेल्या शिक्षण समितीने आपल्या अहवालात लिहिले,

‘‘मेकॉले यांनी मांडलेली शिक्षण पद्धती व नवीन गव्हर्नर जनरल यांनी केलेली निर्णायक कृती यांमध्ये जवळपास 12 वर्षांपर्यंत विवाद झाला. शेवटी शिक्षण समितीने राममोहन यांनी सुचविलेल्या शिक्षणविषयक धोरणास मूक संमती दर्शविली.’’ राममोहन यांनी भारतीय व जुन्या सर्वसाधारण शिक्षण पद्धतीच्या विरोधात वैज्ञानिक शिक्षणाचे जोरदार समर्थन केले. पारंपरिक शिक्षण पद्धतीच्या समर्थकांनी या संदर्भात राममोहनांवर हल्ला चढवला. त्यांनी राममोहन यांच्या नवीन शिक्षण पद्धतीचे गैरअर्थ चुकीच्या पद्धतीने समाजाला पटवून देण्यास सुरुवात केली. सनातनवाद्यांनी तर राममोहन यांच्यावर असा मिथ्यारोप केला की, ‘राममोहन हे संस्कृतद्वेष्टे असून संपूर्ण शिक्षण पद्धतीतून ते संस्कृतचे उच्चाटन करू इच्छित आहेत.’ आणि हा आरोप त्या काळी देशामध्ये सर्वदूर पसरविण्यात आला होता. हा पाशवी, भयानक खोटारडा आरोप एका अशा माणसावर लावण्यात आला होता, ज्याने स्वत: संस्कृतच्या अध्ययन–अध्यापनासाठी व हिंदू एकात्मवादाच्या समर्थनासाठी 1825 मध्येच वेदांत महाविद्यालयाची स्थापना केली होती. 27 जुलै 1826 रोजी लिहिलेल्या एका पत्रात विल्यम अॅडम असे लिहितात, ‘‘उशिरा का होईना पण राममोहन यांनी एक आकर्षक व नीटनेटके असे वेदांत महाविद्यालय स्थापन केले आहे. इथे सध्या काही युवक संस्कृत भाषा व साहित्याचा अभ्यास करत असून विद्वान पंडित लोक त्यांना मार्गदर्शन करीत आहेत. ह्या सगळ्याच उपक्रमाचा उद्देश आहे, हिंदू एकात्मवादाचे समर्थन व प्रचार. यांच्याच जोडीला राममोहन यांचा विचार आहे की, ह्या संस्कृत युरोपियन वैज्ञानिक ज्ञानाची लोकांना ओळख करून द्यावी, ख्रिस्ती एकात्मवादाचा अभ्यास लोकांनी करावा इ. पण हे व्यवहार बंगाली अथवा संस्कृत भाषेतून व्हावेत.’’

शास्त्रीय ज्ञानाची भारतीयांना ओळख व्हावी ह्या बाबीकडे राममोहन यांचे बारकाईने लक्ष होते. अज्ञानामुळे निर्माण झालेल्या अंधश्रद्धा व अंधविश्वासांना झुगारून देण्याची

शक्ती केवळ वैज्ञानिक दृष्टिकोण आत्मसात केल्यानेच येईल असा त्यांचा विश्वास होता. अशाप्रकारे अज्ञानाच्या अंधकाराला मागे टाकून ज्ञानाने प्रकाशित मार्गावर भारतीयांनी वाटचाल करावी, असा राममोहन यांचा मनोदय होता. अगदी याच पद्धतीने युरोपातही इतिहास घडलेला होता, जिथे चर्चच्या पारंपरिक शिक्षण पद्धतीची जागा नूतन विज्ञानाच्या शिक्षणाने घेतली होती. मि. डेव्हिड हेअर व इतरांच्या सहकार्याने 1816 मध्ये जेव्हा हिंदू कॉलेजची स्थापना होत होती तेव्हा राममोहन यांनी या कार्याला स्वत: होऊन हातभार लावला. पण सनातनी हिंदूंना राममोहन यांचा ह्या कॉलेजच्या स्थापनेतील सहभाग मान्य झाला नाही. हे कळताच राममोहन यांनी स्वत: होऊन आपला सहभाग काढून घेतला. हिंदू कॉलेजच्या स्थापनेच्या प्रकल्पामागे प्रमुख प्रेरणा जर कोणाची असेल तर ती राममोहन यांची होती आणि यात यत्किंचितही शंका घेण्यास जागा नाही.

14 मे 1816 रोजी उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायाधीश सर हायड्‌ ईस्ट यांच्या निवासस्थानी एक बैठक घेण्यात आली होती. ह्या बैठकीचा उद्देश होता हिंदू महाविद्यालयाची स्थापना करण्याबाबत विचार करणे. याच ईस्ट महाशयांनी चार दिवसांनी एक पत्र इंग्लंडमधील एक न्यायाधीश श्री. जे. हॅरिंग्टन यांना लिहिले. या अत्यंत रोचक अशा पत्रात ते लिहितात, "योग्य काळ-वेळ आली असता सगळ्याच गोष्टींमध्ये बदल घडून येतात हे दर्शविणारी उत्साहवर्धक आणि उत्सुकता वाढविणारी एक घटना मला नुकतीच पाहावयास मिळाली. कलकत्त्यात राहणारा माझ्या माहितीचा एक ब्राह्मण मला भेटला. हा ब्राह्मण (राममोहन रॉय) अत्यंत बुद्धिमान म्हणून प्रसिद्ध असून भारतातील प्रमुख व्यक्तींपैकी एक आहे. त्याचबरोबर त्याची आपल्यापैकी अनेकांशी जवळीक आहे. त्याचे म्हणणे असे होते की, अनेक हिंदू कुटुंबांमधील प्रमुख व्यक्तींना असे वाटते आहे की, त्यांच्या मुला-मुलींना युरोपियन पद्धतीचे शिक्षण मिळण्याची काहीतरी सोय व्हावी. ह्या संदर्भात एक बैठक घेण्यात यावी, तिचे अध्यक्षपद मी भूषवावे आणि ह्या कामात 'मी' मदत करावी अशी त्यांची माझ्याकडून अपेक्षा आहे. तो (राममोहन) निघून गेल्यावर हा घडलेला संवाद मी गव्हर्नर जनरल यांच्या कानावर घातला. त्यांनी याचा उल्लेख सुप्रीम कौन्सिलसमोर केला. सर्व काहीं ऐकून घेतल्यावर कौन्सिलच्या सदस्यांनी माझ्या म्हणण्याला होकार दिला. इतकेच नव्हे तर या बाबतीत माझ्या निवासस्थानी बैठका घेण्याचीही परवानगी दिली. त्यानुसार 4 मे 1816 रोजी एक बैठक आयोजित करण्यात आली. ह्या बैठकीला समाजामध्ये पद, पैसा व प्रतिष्ठा असलेले पन्नासपेक्षाही जास्त हिंदू रहिवासी उपस्थित होते. त्यांच्यापैकी बरेच विद्वान पंडितही होते. याच बैठकीत जवळपास पन्नास हजार रुपये गोळा झाले आणि अजूनही काहींनी आर्थिक मदत देण्याच्या शपथा घेतल्या आहेत. सभेच्या नंतरच्या कामकाजाबाबत बोलणे चालू असताना एक उच्चवर्णीय, प्रतिष्ठित आणि संपन्न असा ब्राह्मण बोलावयास उभा राहिला. त्याने सरळसरळ राममोहनवर



हल्लाच चढवला, व त्वेषाने त्यांच्यावर तुटून पडला. कारण राममोहन यांनी नुकतेच हिंदूंच्या मूर्तिपूजेच्या विरोधात आपल्याच देशबांधवांवर कडक टीका करणारे लिखाण केले आहे."

हिंदू महाविद्यालयाच्या योजनेला चालना देण्यासाठी काम करणाऱ्यांपैकी राममोहन हे अग्रेसर होते याबाबत वरील उद्धरणावरून संशयाला जागाच राहत नाही. इतकेच नव्हे तर आपण असल्याने ही योजना धोक्यात येत असल्याचे निदर्शनास येताच राममोहन यांनी सहजतेने स्वत:ला त्यापासून वेगळे करून घेतले. यात त्यांच्या मनातील हिंदू महाविद्यालय होण्याबाबतचे प्रामाणिक विचार स्पष्टपणे दिसून येतात.

युनिटेरियन असोसिएशनची तत्वत: मान्यता घेऊन राजा राममोहन रॉय यांनी 1822 मध्ये एका इंग्लिश हायकूलचा शुभारंभ केला. ह्या शाळेचा सर्व खर्च त्यांनी एकट्याने सहन केला. डेव्हिड हेअर व रेव्ह. ॲडम हे व्यवस्थापनात होते. देवेंद्रनाथ टागोर हे ह्या शाळेचे विद्यार्थी होते. इतर शाळांमधून विज्ञानासाठी इंग्रजी माध्यम असताना इथे तो विषय बंगालीतून शिकवला जात असे. डिसेंबर 1821 पासून राममोहन यांनी 'संवाद कौमुदी' नावाचे एक बंगाली भाषेतील साप्ताहिक सुरू केले. ह्या नियतकालिकाच्या एका अंकामध्ये त्यांनी सरकारला आवाहन करणारा लेख लिहिला. आर्थिक दृष्ट्या कमकुवत असलेल्या हिंदूच्या मुला-मुलींना नि:शुल्क शिक्षण मिळण्याची व्यवस्था केली पाहिजे असे त्यात म्हटले होते. 1821-24 ह्या कालखंडामध्ये त्यांनी अनेक वैज्ञानिक विषयांवर लेख लिहिले. उदा. 'ध्वनिशास्त्र व प्रतिध्वनी', 'चुंबकाचे गुणधर्म', 'माशाचे वर्तनप्रकार', 'फुग्याचे प्रकार व उपयोग' इत्यादी. व्याकरण, भूगोल, खगोलशास्त्र, भूमिती इ. विषयांवर त्यांनी बंगालीमध्ये अनेक ग्रंथ लिहिले.

शिक्षणामध्ये रसायनशास्त्र, गणित इ. मूलभूत विज्ञानाशी संबंधित विषय यावेत यासाठी राममोहन यांनी जिवापाड कष्ट घेतले. ह्या कष्टाची फळे मात्र त्यांच्या मृत्यूनंतर अनेक वर्षांनी भारतीय समाजाला चाखावयास मिळाली.

# 6

## बंगाली गद्याचे जनक

एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी असलेले बंगाली गद्यलेखन हे जवळपास संस्कृत-प्रचुर असे होते. बंगाली गद्य हे त्या वेळी अत्यंत ठिसूळ आणि दयनीय अवस्थेत होते. जास्तीत जास्त संस्कृत शब्द घुसवून लेखन करणाऱ्या संस्कृत पंडितांच्या दयेवरच बंगाली भाषेतील लिखाण तग धरून होते. 19व्या शतकाच्या प्रारंभी आपल्याला बंगाली गद्य-लेखन इतक संस्कृतमय झालेले दिसेल, की त्यात अपवादाने वापर झालेल्या काही बंगाली शब्दांमुळेच 'बंगाली' हे विशेषण त्याला लावता येईल.

बंगाली भाषेतील लिखाणाला सर्वप्रथम श्रीरामपूरचे मिशनरी व फोर्ट विल्यम् कॉलेजच्या विद्वानांनी प्रोत्साहन दिले. बंगाली जनतेमध्ये ख्रिस्ती धर्मप्रसारासाठी मिशनऱ्यांना हे लिखाण आवश्यक होते तर दुसरीकडे फोर्ट विल्यम् कॉलेज हे सरकारने चालवलेले असल्यामुळे कॉलेजला प्रशासनिक दृष्टिकोनातून बंगाली गद्याची आवश्यकता होती. बंगाली लोकांशी प्रत्यक्ष संपर्क साधता यावा म्हणून तरुण ब्रिटिश अधिकाऱ्यांना बंगाली भाषेचे शिक्षण दिले जाऊ लागले.

1778 मध्ये श्री. हालहेड यांनी इंग्रजी भाषेत 'बंगालीचे व्याकरण' हे पुस्तक प्रकाशित केले. त्याच्या मुखपृष्ठावरच असे स्पष्टपणे छापले आहे की, हे व्याकरण फिरंग्यांच्या उपयोगासाठी आहे. (फिरंगीनाम् उपकारार्थ) यानंतर श्रीरामपूरचे प्रसिद्ध मिशनरी डॉ. कॅरींनी बंगाली व्याकरण लिहिण्याचा प्रयत्न केला व 1801 मध्ये ते पुस्तकरूपाने प्रकाशित झाले. हेदेखील इंग्रजीमध्ये असून नवनियुक्त ब्रिटिश अधिकाऱ्यांना लवकरात लवकर एतद्देशीय जनतेबरोबर एतद्देशीय भाषेत संपर्क साधण्यासाठी उपयोग व्हावा हाच प्रमुख उद्देश होता.

पण बंगाली लोकांसाठी बंगाली भाषेचे व्याकरण बंगालीमध्येच लिहिण्याचा पहिला प्रयत्न राममोहन यांनी केला. इंग्लंडला जाण्यापूर्वी राममोहन यांनी 'गौडीय व्याकरण' हे बंगाली भाषेच्या व्याकरणाचे पुस्तक लिहिले. 1933 मध्ये याचे प्रकाशन कलकत्ता स्कूल बुक सोसायटीतर्फे करण्यात आले. अकरा प्रकरणांच्या ह्या पुस्तकात अडुसष्ट विषयांवर विस्तृत लिखाण केलेले होते. यात सुरुवातीला व्याकरणाची गरज, तर शेवटी यमक योजनेबद्दल लिहिलेले होते.



बंगाली गद्याचे पहिले पुस्तक 1801 मध्ये प्रकाशित झाले. विदेशी लोकांच्या अभ्यासक्रमासाठी हे पुस्तक श्री. रामराम बसू यांनी लिहिले होते. 1802 मध्ये पं. मृत्युंजय विद्यालंकार यांनी 'सिंहासन बत्तीसी' प्रकाशित केले. रामराम बसू यांच्या 'प्रतापादित्यचरित्रा'पेक्षा हे पुस्तक निश्चितच सरस होते. विद्यालंकारांचे पुस्तक हे 'क्रमिक' पुस्तक असल्यासारखे असून त्यात संस्कृतचा मोठ्या प्रमाणावर वापर होता. अशा प्रकारे, ह्या कालखंडातील बंगाली लिखाण हे केवळ क्रमिक पुस्तकांच्या लिखाणापुरतेच मर्यादित होते.

राममोहन यांच्या प्रवेशानंतर आपणाला बंगाली साहित्य लेखनाच्या क्षेत्रात क्रांतिकारक बदल पाहावयास मिळतो. राममोहन यांचे पहिले गद्यलेखन 1815 मध्ये 'वेदांत ग्रंथ' या नावाने प्रसिद्ध झाले. हे लिखाण प्रचलित बंगाली लिखाणापेक्षा संपूर्णत: भिन्न होते. ते संपूर्णत: बंगालीमध्ये होते आणि ते नेहमीसारखे क्रमिक पुस्तक नव्हते. क्लिष्ट अनाकलनीय संस्कृत शब्दांचा वापर करून यात पुस्तकाची दुर्बोधता वाढवलेली नव्हती. हे पुस्तक खऱ्या अर्थाने पूर्णपणे 'बंगाली' होते. राममोहन यांनी या पुस्तकाच्या प्रस्तावनेत बंगाली कसे वाचावे, याबद्दल वाचकांना सूचना दिल्या. बंगाली वाक्यरचना कशी असावी याबद्दलचे नियमही सांगितले.

ही प्रस्तावना म्हणजे राममोहन यांच्या स्पष्ट आणि मूलगामी विचारांचे लक्षणीय उदाहरण आहे. राममोहन यांनीच रचलेल्या बंगाली गद्यलेखनाच्याच भक्कम पायावर पुढे बंकिमचंद्र चटर्जी व रवींद्रनाथ टागोर यांनी उच्चकोटीच्या गद्यलेखनाचे मजले चढविले.

# 7

## बंगाली भाषेतील धृपदाची पदे

संगीत क्षेत्रातही राममोहन यांचे योगदान महत्त्वाचे आहे. एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या दोन दशकांत बंगालीमध्ये ठुमरी, टप्पा, कीर्तन व रामपरसादी ह्या गायन–प्रकारांचे चलन मोठ्या प्रमाणात होते. त्याचबरोबर बाउल, 'सारी, जारी' हे लोकगीताचे प्रकारही प्रसिद्ध होते. पण बंगाली लोकांना धृपद हा गायन–प्रकार त्या काळी पूर्णत: अनोळखी होता. जे काही धृपद होते ते सगळे हिंदीत होते. बंगालीत धृपदगीतांची रचना करणारे राममोहन हे पहिले रचनाकार. राममोहन यांनी या गायन–प्रकाराची ओळख 1828 मध्ये ब्राह्मसमाजाच्या एका बैठकीत लोकांना करून दिली. हा गायन–प्रकार राममोहन यांना अतिशय आवडला, कारण धृपद अत्यंत गंभीर प्रकृतीचा, साधेपणा असलेला, सुरावटींचा उगीच शोभेसाठी वापर नसलेला आणि एक प्रकारची वैभवशाली परंपरा असलेला गायन–प्रकार होता. ब्रह्मसभांच्या बैठकीसाठी टप्पां आणि ठुमरीचे गायन राममोहन यांच्या दृष्टीने अत्यंत पोरकटपणाचे होते. म्हणून मग आपल्या सभेच्या बैठकीच्या सुरुवातीला म्हणण्यासाठी त्यांनी 32 धृपद गीतांची रचना बंगालीमधे केली. त्यांच्या पश्चात ब्राह्मोसमाजाने धृपदचा स्वीकार केला आणि देवेंद्रनाथ ठाकूर यांच्या मार्गदर्शनाखाली धृपद गायनपरंपरा जी समृद्ध झाली तिला तोड नाही.

# 8

## राजकीय सुधारणांचा जोर

राजकीय आणि सामाजिक क्षेत्रात ज्या सुधारणा राममोहन करू इच्छित होते त्याचा प्रभाव राजकीय क्षेत्रावरही होणार याविषयी त्यांच्या मनात तिळमात्र संशय नव्हता. 1828 मध्ये राममोहन यांनी लिहिले, ''सद्यस्थितीमध्ये ज्या प्रकारच्या धार्मिक व्यवस्थेला हिंदू समाज उराशी बाळगून आहे, त्याचा संपूर्ण देशाला राजकीय दृष्ट्या थोडासाही फायदा होणार नाही हे मला अत्यंत खेदपूर्वक सांगावेसे वाटते. एकीकडे जातीभेद, त्यामध्येही असंख्य पोटजाती, यांच्यामध्ये समाजाची अशी काही विभागणी झालेली आहे की, कोणत्याही प्रकारच्या राजकीय जाणिवा त्यात शिल्लक नाहीत. तर दुसरीकडे धार्मिक रीतीरिवाज, संस्कार समारंभ आणि शुद्धीकरणाचे नियम इत्यादींनी या समाजाला अवघड उद्यमशीलतेस अपात्रच बनवून टाकले आहे. ह्या समाजाच्या हितासाठी, सामाजिक स्वास्थ्यासाठी व राजकीय फायदे मिळण्यासाठी त्यांच्या धार्मिक प्रक्रियेत काहीतरी बदल, सुधारणा घडवून आणणे अत्यावश्यक आहे असे मला राहून राहून वाटते.'' धर्मसुधारणा आणि सामाजिक व राजकीय विकास यांच्यामध्ये असलेल्या अंत:संबंधांचे उत्तम ज्ञान राममोहन यांना होते.

राममोहन यांनी 1821–22 मध्ये दोन साप्ताहिके सुरू केली 'संवाद कौमुदी' बंगालीमध्ये तर 'मीरात–उल–अखबार' फारशी भाषेमध्ये. 'संवाद कौमुदी'च्या एका अंकात त्यांनी आपल्या लेखामध्ये ज्यूरीने चालवलेल्या एका खटल्याचे कौतुक केले होते. हा खटला वर्तमानपत्रांच्या स्वातंत्र्याबाबत होता. राममोहन यांनी वर्तमानपत्राच्या स्वातंत्र्याचे समर्थन केले होते. ज्यूरी सदस्यांमध्ये भारतीय असावेत का? हादेखील खटल्याचा एक विषय होता. 1726 मध्ये मेयरच्या कोर्टाची स्थापना करण्यात आली आणि त्यात ज्यूरींच्या साह्याने खटला चालवण्याची पद्धत प्रथमच सुरू करण्यात आली. 1774 मध्ये मेयरच्या कोर्टाऐवजी सुप्रीम कोर्टाची स्थापना होईपर्यंत चालू होती. मि. वीन यांनी मांडलेले इंडियन ज्यूरी बिल पार्लमेंटमध्ये 5 मे 1826 मध्ये मंजूर झाले. पण ह्या कायद्यामध्ये भारतीयांच्या बाबतीत भेदभाव करण्यात आला होता. भारतीयांना केवळ सर्वसाधारण खटल्यांमध्येच ज्यूरी म्हणून काम पाहता येणार होते. त्यांना मोठे खटले व ख्रिश्चन लोकांवरील

खटल्यांमध्ये काम करता येणार नव्हते. भारतीयांवर होणाऱ्या ह्या भेदभावाच्या विरोधात राममोहन यांनी अविरत प्रचार सुरू केला. त्यांनी हिंदू आणि मुस्लीम – दोहोंच्या सह्या घेऊन ब्रिटिश पार्लमेंटसमोर एक याचिका दाखल केली. याचिकेच्या संदर्भात असलेली भूमिका त्यांनी स्वत: लिहिली. 5 जुलै 1829 रोजी ही याचिका दाखल केली. मि. ग्रान्ट यांचा ईस्ट इंडिया जस्टिस ऑफ पीस अँड ज्यूरी हा कायदा मंजूर झाला. श्रीरामपूरच्या मिशनऱ्यांनी राममोहन रॉय यांचे हा कायदा पास झाल्यावर आपल्या 'समाचार दर्पण'मध्ये अभिनंदन केले.

लॉर्ड वेलस्लीच्या कालखंडात वर्तमानपत्रावर निर्बंध घालणारा सेन्सॉरशिपचा कायदा प्रथमच अमलात आणला गेला. हा कायदा नंतर 1818 मध्ये लॉर्ड मोईरा यांनी जरी रद्द केला तरीही 1823 मध्ये प्रभारी गव्हर्नर जनरल श्री. जॉन ॲडम यांनी वर्तमानपत्रांच्या विरुद्ध 1823 मध्ये बंधनकारक नियम लागू केला. गव्हर्नर जनरल कौन्सिलचे एक सदस्य श्री. डब्ल्यू. बी. बेली यांनी वर्तमानपत्रांना दिलेले स्वातंत्र्य रद्द करण्याच्या बाजूने कौल दिला. त्यांचे म्हणणे होते की, स्थानिक वर्तमानपत्रे ह्या विशेषाधिकाराचा गैरवापर करतात. त्यांनी 'मिरात–उल–अखबार'चा संदर्भ दिला होता. प्रेस कायदा 1823 मध्ये लागू झाल्याने राममोहन यांना या साप्ताहिकाचे प्रकाशन थांबवावे लागले. कारण ऑगस्ट 1822 च्या या नियतकालिकाच्या अंकात त्रित्ववादावरील लेखातील काही उल्लेख 'अत्यंत आक्रमक' होते, असे अधिकाऱ्यांचे म्हणणे होते.

10 ऑक्टोबर 1822 रोजी झालेल्या सुप्रीम कौन्सिलच्या सभेच्या नोंदीत खालील माहिती आढळते. 'मिरात–उल–अखबार' नावाच्या अजून एका पर्शियन वर्तमानपत्रातील आशयदेखील असाच आहे. पण हे संपादक एक सर्वश्रुत असे धर्मग्रंथांचे अभ्यासक व शास्त्रार्थ करणाऱ्यांपैकी आहेत. त्यांनी त्रित्ववादावर शेरे मारण्याची संधी घेतली आहे. राममोहन यांचे लिखाण उघडउघडपणे टीकात्मक नसले तरी त्यातील छद्मीपणा हा स्पष्ट जाणवण्यासारखा आहे. ह्या प्रकाराचे वर्णन 'अत्यंत निंदाजनक' अशाच शब्दांत करता येईल.'' त्याचप्रमाणे 'कलकत्ता जर्नल'चे एक संपादक होते, जे. एस. बकिंगहॅम. त्यांनी प्रकाशित केलेला एक लेख सरकारला 'अपमानकारक' वाटला. एका लेखामध्ये त्यांनी डॉ. ब्राईसवर टीका केली होती. डॉ. ब्राईस हे न्यू स्कॉटलँड चर्चचे प्रमुख असूनही त्यांनी भारतात ईस्ट इंडिया कंपनीमध्ये स्टेशनरी कारकून म्हणून नोकरी पत्करली होती. बकिंगहॅमच्या मते चर्चच्या प्रमुखाने अशा प्रकारच्या नोकऱ्या करणे हे त्यांना शोभणारे नव्हते. ह्या लेखामुळेच बकिंगहॅम यांना 12 फेब्रुवारी 1823 रोजी दोन महिन्यांत भारत सोडून जाण्याची आज्ञा करण्यात आली. ही आज्ञा लॉर्ड हेस्टिंगनंतर हंगामी गव्हर्नर जनरल म्हणून नियुक्त झालेल्या जे. ॲडम यांनी दिली होती.

'कलकत्ता जनरल'वर बंदी आणण्यात आली व त्याचे सहाय्यक संपादक सँडफोर्ड अरनॉट यांना अटक होऊन त्यांची रवानगी इंग्लंडला करण्यात आली. 14 मे 1823 रोजी



मि. ॲडम यांनी प्रेस ऑर्डिनन्स् कायदा लागू केला. त्या अन्वये वर्तमानपत्राचे मालक व संपादक यांना सरकारकडून परवाना मागणे सक्तीचे झाले. हा कायदा सुप्रीम कोर्टापुढे रजिस्ट्रेशनला आल्याच्या दोनच दिवसानंतर म्हणजे 17 मे 1823 रोजी राममोहन, द्वारकानाथ टागोर, प्रसन्नकुमार टागोर व इतर तिघांनी मिळून सुप्रीम कोर्ट, व इंग्लंडच्या राजासमोर ह्या कायद्याच्या विरोधात याचिका दाखल केली. या महत्त्वाच्या याचिकेचा मसुदा राममोहन यांनी लिहिला होता, तो याप्रमाणे आहे, '... विद्वत्तापूर्ण अशा अनेक पौर्वात्य भाषांमधून सध्या भारतीय बोलीभाषांमध्ये ज्ञानाचा प्रसार होत असून लोकांची बौद्धिक प्रगती होत आहे. तसेच विदेशी प्रकाशकांनी प्रकाशित केलेले ज्ञानभांडार स्थानिक भारतीयांना आता कोठे उपलब्ध होऊ लागले असतानाच त्या कायद्याद्वारे ह्या प्रक्रियेला अगदीच पूर्णविराम मिळणार आहे. त्याचप्रमाणे ह्या विशाल भूप्रदेशावर राज्यकारभारासाठी आलेल्या अधिकाऱ्यांच्या हातून काही चुका, अन्याय झाला तर तो सरकारच्या निदर्शनास आणून देणे स्थानिक जनतेला जवळपास दुरापास्त होऊन जाईल. न्याय व शिस्तप्रिय अशा ब्रिटिश राजाशी प्रामाणिक व मोकळेपणाने संवाद साधणे शक्य होणार नाही. तिथे इंग्लंडमध्ये सुदूर अंतरावर असलेल्या राजाला आपल्याशी इमान राखून असणाऱ्या प्रजेचे स्थानिक प्रशासन काय हाल करते हे कळणार नाही. स्थानिक वर्तमानपत्रांमधून प्रकाशित झालेला मजकूर भाषांतरित करून इंग्लंडमधे इंग्रजीत प्रकाशित करणे अथवा काही इंग्रज प्रकाशकांनी इथे येऊन स्थायिक होण्याच्या दृष्टीने प्रकाशन व्यवसाय सुरू करणे ह्या दोन्ही आदानप्रदान प्रक्रिया ज्या आतापर्यंत होत होत्या केवळ ह्या एका कायद्यामुळे बंद पडणार आहेत. कोणताही कुशल शासनकर्ता हा मानवी अपूर्णत्वाला जाणून असतो. तो शासनकर्ता जर 'त्या' दैवी शासकाचा आदरसन्मान करणाऱ्यांपैकी असेल तर आपल्या साम्राज्याची निगा राखण्याची जबाबदारी तो समर्थपणे पार पाडत असताना तिळमात्रही चुकणार नाही. म्हणून आपल्या प्रजेला काय हवे आहे हे जाणून घेण्याची एकही संधी हा शासक सोडणार नाही; उलट त्यांच्यासाठी वेगवेगळ्या माध्यमांची उपलब्धता वाढविण्याचा प्रयत्न करताना दिसून येईल. ह्या उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी मला वाटते वर्तमानपत्रांना अनिर्बंध स्वातंत्र्य देणे हाच सर्वोत्तम व प्रभावशाली उपाय आहे.''

सुप्रीम कोर्टाने ही याचिका फेटाळून लावली आणि याचा निषेध म्हणून राममोहन यांनी आपल्या पर्शियन साप्ताहिकाचे प्रकाशन थांबवले. 1831 मध्ये ईस्ट इंडिया कंपनीच्या सनदीचे नूतनीकरण करण्यात आले. या प्रसंगी राममोहन यांनी हाऊस ऑफ कॉमन्सच्या एका समितीसमोर आपली साक्ष दिली. त्यात राममोहन यांनी सुचविले की, भारतीयांना ज्युडिशिअल ॲसेसर म्हणून अथवा सहाय्यक न्यायाधिकारी म्हणून नेमले गेले पाहिजे. फौजदारी व गुन्हेगारी कायदे तयार करावेत व सार्वजनिक नोंदवही ठेवली जावी यासाठी त्यांनी आग्रह धरला. सरकारी खर्चात कपात व्हावी अशी त्यांची आग्रही भूमिका होती. त्याचबरोबर सैन्यातील सैनिकांची संख्या कमी करून शेतकऱ्यांच्या लढाऊ तुकड्या

निर्माण करणे, न्यायिक क्षेत्र व कार्यकारी क्षेत्र एकमेकांपासून वेगळे न करणे, ग्रामपंचायतीची स्थापना करणे व त्याला ज्यूरींचे अधिकार देणे अशा अनेक मौलिक सूचना राममोहन यांनी सरकारला केल्या.

'बंगाली स्पेक्टेटर'च्या संपादकांनी 1842 मध्ये लिहिले, 1833 मधील कायद्यान्वये आपणाला ज्या सवलती मिळाल्या आहेत त्यासाठी आपण सर्वजण राममोहन यांचे फार उपकार मानले पाहिजेत.'' 'समाचार दर्पण'मध्ये असे लिहून आले, ''आपल्या देशाला अनुकूल गोष्टी मिळवून देण्यामध्ये राममोहन यांनी अथक परिश्रम घेतलेले आहेत. केवळ वर्तमानातीलच नव्हे तर भविष्यात देशवासीय यासाठी राममोहन यांचे उपकारकर्ता म्हणून नाव घेतील.'' राममोहन यांचे इंग्लंडमध्ये राहणारे एक सचिव श्री. अरनॉट यांनी राममोहन यांच्या विचारांच्या नोंदी करून ठेवल्या आहेत. त्यांच्या मताप्रमाणे इंग्रजांच्या सांस्कृतिक व राजकीय संकल्पना भारतात रुजवण्यासाठी ४० वर्षांचा कालावधी पुरेसा होता. ह्या कालावधीमध्ये इंग्रजांना भारतीयांचा जागतिक संस्कृतीशी परिचय घडवून आणणे व लोकशाही राज्यकारभाराशी भारतीयांची ओळख करून देणे सहज शक्य होईल, असा राममोहन यांना विश्वास वाटत होता.

इंग्लंडमधील रिफॉर्म बिल चळवळीला राममोहन यांनी संपूर्ण पाठिंबा दिला. त्यांच्या मताप्रमाणे सुधारणावादी व सुधारणाविरोधी यांच्यामध्ये जो झगडा होता तो शाश्वत स्वरूपाचा असून ''हा लढा स्वातंत्र्य व जुलमी सत्ता यांच्यामधील, न्याय विरुद्ध अन्याय, योग्य विरुद्ध अयोग्य अशा स्वरूपाचा आहे. आम्हाला असे वाटते की, राजकारण व धर्म ह्या क्षेत्रांमध्ये उदारमतवादी तत्त्वांनी फार पूर्वीपासूनच आपली मुळे रूजवली आहेत. ह्या प्रक्रियेवर कोणाच्याही विरोधाचा, कडव्या मतांचा, तीव्र निषेधाचा अथवा जुलमी राजवटीचादेखील काहीही परिणाम झाला नसून ती निरंतर गतिमान होते आहे.'' 1832 मध्ये जेव्हा भारतीय सुधारणा कायदा पास केला गेला तेव्हा राममोहन यांना अत्यानंद झाला. विल्यम राथबोन नावाच्या मित्राला लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात, ''सरंजामदारांनी केलेल्या हिंसक विरोधाला न जुमानता हा कायदा पास झाला ह्याचा मला आनंद झाला आहे. इतरांना विनाशाच्या गर्तेत फेकून, उद्ध्वस्त करून स्वत:चे उखळ पांढरे करणाऱ्या किंवा आपल्या तिजोऱ्या भरणाऱ्या काही मूठभर लोकांच्या भक्ष्यस्थानी एखादे राष्ट्र जास्त काळ राहू शकणार नाही. जवळपास ५० वर्षांच्या काळात ह्या देशाने बरेच काही सोसले आहे. हा सुधारणेचा कायदा संमत झाला नाही तर मी या देशाशी असलेला माझा संबंध तोडून टाकीन, असे मी जाहीररीत्या सांगितले होते. पण मला अभिमानाने सांगावेसे वाटत आहे की, माझ्यावर तशी वेळ आली नसून मला तुमच्यासह देशाला झालेल्या अत्यानंदात सहभागी होण्याचे सौभाग्य लाभले आहे. एका देशाच्याच नव्हे तर जगाच्या मुक्तीचा मार्ग मोकळा झाला आहे व ह्या घटनेचा साक्षीदार होण्याचे भाग्य लाभल्याने मला आनंद होत आहे.''

केवळ भारतासाठीच नव्हे तर जगातील प्रत्येक देशाने लोकशाही हक्कांसाठी व स्वातंत्र्यासाठी दिलेल्या लढ्याच्या बाजूने राममोहन ठामपणे उभे राहिले. स्पेनच्या जुलमी



राजवटीच्या तावडीतून दक्षिण अमेरिकेतील स्पॅनिश वसाहतींना 1823 मध्ये स्वातंत्र्य मिळाल्याची बातमी आली आणि राममोहन यांना अतीव आनंद झाला. ही घटना साजरी करण्यासाठी त्यांनी आपल्या मित्रांना मेजवानीसाठी आमंत्रित केले. मित्रांनी मेजवानीचे कारण विचारले असता ते म्हणाले, ''अहो, हे काय विचारणं झालं? माझे बंधुवत असलेल्या लोकांच्या यातना, वेदना मला का जाणवू नयेत. मग ते कोणीही का असेनात कोणत्याही जातिधर्मांचे का असेनात अथवा कोणत्याही प्रदेशाचे निवासी का असेनात?''

एडिंबर मॅग्झीनमध्ये त्यांच्या एका इंग्रज मित्राने सप्टेंबर 1823 मध्ये लिहिले, 'ज्या प्रकारची मन:पूर्वक आस्था राममोहन यांनी दक्षिण अमेरिकेच्या मुक्ततेच्या बाबतीत प्रदर्शित केली आहे त्यावरून राममोहन यांचा मोठेपणा व उदारमतवादी उच्च विचारांची प्रचीती येते.'' त्याचप्रमाणे पोर्तुगालमध्ये घटनात्मक सरकार स्थापन झाल्याचे कळल्यावर राममोहन यांना अत्यानंद झाला. ग्रीकांनी तुर्कांच्या विरुद्ध दिलेल्या स्वातंत्र्यलढ्याचे समर्थन केले. नेपल्समध्ये काही काळानंतर 1815 मधे कार्बोनरी समाजाची स्थापना करण्यात आली. ह्या 'समाजाची' लोकप्रियता इतकी वाढली की, 1820-21 मध्ये त्याने निपोलिटन कार्बोनरीचे स्वरूप धारण केले. ह्या कार्बोनरीने नेपल्सच्या बुरबॉन राज्यांच्या विरोधात बंड पुकारले. घटनात्मक राज्य, सर्व वर्गांमध्ये समानता आणणे आणि आपल्या भाग्याचा निर्णय घेण्याचा लोकांना हक्क या त्यांच्या प्रमुख मागण्या होत्या. बंड करणाऱ्यांना चिरडून टाकण्यात आले आणि मोरेली व सिल्बाटी ह्या नेत्यांना फासावर लटकवण्यात आले. ह्या घटनेमुळे राममोहन यांना इतके तीव्र दु:ख झाले की, त्यांनी मि. बकिंगहॅमबरोबरची आपली भेट रद्द केली व एक पत्र लिहून पुढील शब्दांत आपल्या भावना प्रकट केल्या, ''आज दुपारी आपल्याकडील मेजवानीचे निमंत्रण मला आहे पण ह्या आनंदापासून मी स्वत:ला पारखे करावयाचे ठरवले आहे. विशेषत: आज दुपारी मला युरोपातून आलेली जी बातमी मिळाली आहे त्याने माझे मन विषण्ण झाले आहे. ह्या अप्रिय बातमीमुळे मला ह्या निष्कर्षाप्रत येणे भाग पडले आहे की माझ्या जिवंतपणी तरी युरोपीय देशांमध्ये स्वातंत्र्याची पुनर्स्थापना होणे शक्य दिसत नाही. आशियायी देशांमधून ज्या युरोपियनांच्या वसाहती आहेत त्यांच्या भाग्यातही स्वातंत्र्यसूर्याचे दर्शन अशयात होणे नाही. अशा परिस्थितीमध्ये बुरबॉन राजाच्या विरोधात स्वातंत्र्यासाठी प्राणार्पणास तयार असलेले नेपोलिटन्स मला आपले वाटतात तर त्यांचे शत्रू हे माझे शत्रू. जुलमी राजवटीचे मित्र आणि स्वातंत्र्याचे शत्रू हे कधीच यशस्वी झालेले नाहीत व पुढेही होणार नाहीत.''

आयर्लंडच्या बाबतीत ब्रिटिशांच्या धोरणाचाही राममोहन यांनी विरोध केला. आपल्या 'मिरात-उल-अखबार'मध्ये त्यांनी या धोरणाच्या विरोधात लिखाण केले. आयर्लंडमध्ये पडलेल्या दुष्काळातील पीडितांना राममोहन यांनी अर्थसाहाय्य केले. फ्रेंच राज्यक्रांतीच्या संदेशामुळे त्यांचे हृदय हेलावून गेले. हा प्रभाव इतका होता की, एकदा ह्या फ्रेंच

क्रांतिध्वजाला सॅल्युट करताना त्यांचा पाय घसरला व ते बोटीवरून पडल्याने पायाला इजा झाली. राममोहन यांच्या मनामध्ये स्वातंत्र्यासाठी अपार प्रेम होते. जीवनात त्यांनी सर्व प्रकारच्या उपक्रमांमधून सक्रिय सहभाग घेतला. उदा. राजकीय, सामाजिक, धार्मिक इ. पण ह्या सर्व उपक्रमांमागे मूलस्रोत जर कोणता असेल तर तो म्हणजे स्वातंत्र्याचे निस्सीम प्रेम. ह्याच प्रेमाने त्यांनी समस्त मानवजातीला जवळ केले. आंतरराष्ट्रीयत्वाच्या खऱ्या आणि स्पष्ट संकल्पना असणारी अठराव्या शतकातली ही पहिलीच व्यक्ती होती असे म्हणणे भाग आहे.

राममोहन यांनी 26 डिसेंबर 1831 रोजी प्रिंस टेलीरॅड यांना उद्देशून एक पत्र लिहिले. लंडनहून लिहिलेल्या ह्या पत्रामध्ये त्यांनी फ्रान्सच्या परदेश मंत्र्यांना स्वत:साठी पासपोर्ट मिळवून देण्याबाबत लिहिले होते. हे पत्र म्हणजे ऐतिहासिकदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा दस्तावेज आहे. ह्या पत्रात त्यांनी पासपोर्ट पद्धतीच रद्द करावी असे मत मांडले ते लिहितात, ‘‘अशा प्रकारचा नियम आशियायी देशांमधून कधीच पाहावयास मिळाला नाही. (हे खरे आहे की आशियाई देशांमध्ये आपापसात प्रचंड शत्रुत्वाची भावना आहे. हे शत्रुत्व राजकीय व धार्मिक पूर्वग्रहांना धरून आहे तरीही तेथे पासपोर्ट पद्धत नाही) केवळ चीनचा एक अपवाद आहे. कारण हा देश परकीयांचा द्वेष करण्यासाठी तसेच नवीन माहिती, रूढी यांची आपल्या देशवासीयांना ओळख होणार नाही याची काळजी घेणारा म्हणून प्रसिद्ध आहे. सर्वच बाबतीत उदारता व सौजन्याच्या वर्तणुकीसाठी प्रसिद्ध असलेल्या फ्रान्ससारख्या देशातही पासपोर्ट पद्धतीचे अस्तित्व आहे हे कळल्यावर आता काय बोलावे हेच कळत नाही. संपूर्ण मानवजात ही एकाच विशाल कुटुंबासारखी असून अस्तित्वात असलेले वेगवेगळे देश आणि समुदायाने राहणारे हे केवळ त्या कुटुंबाच्या विविध शाखांप्रमाणे आहेत. आणि ही गोष्ट केवळ धर्माच्या साह्यानेच नव्हे तर सारासार विवेक आणि त्यांच्या जोडीला शास्त्रोक्त पद्धतीने केलेल्या संशोधनाने सिद्ध झालेली आहे. म्हणून जगातील वेगवेगळ्या देशांमधील विद्वानांना आपल्या विचारांची आपापसात देवाणघेवाण करता यावीशी वाटणे व ह्या दळणवळणास प्रोत्साहन द्यावेसे वाटणे साहजिकच आहे. अशी वैचारिक देवाणघेवाण होत असताना त्या मार्गात येणारे सर्व अडथळे दूर करणे आवश्यक आहे, कारण ह्या व्यवहारामुळे संपूर्ण मानव जातीचा परस्पर फायदा होणार आहे आणि तिला आनंद मिळणार आहे.’’

त्याच पत्रात राममोहन यांनी राष्ट्राराष्ट्रांतील मतभेद मिटविण्यासाठी एका वरिष्ठ राष्ट्रसंघाची निर्मिती करण्याची कल्पना मांडली. ते म्हणतात, ‘‘विविध राष्ट्रांच्या घटनात्मक लोकसभेतील सदस्य समान प्रमाणात घेऊन स्थापन केलेल्या वरिष्ठ राष्ट्रसंघासमोर त्या राष्ट्रातील राजकीय मतभेद ठेवण्यात आले तर त्यांची सोडवणूक चांगल्या प्रकारे होऊ शकेल. दोन्ही राष्ट्रांनी बहुमताने दिलेल्या निर्णयाचा स्वीकार करावा. या वरिष्ठ राष्ट्रसंघाचे



अध्यक्षपद आळीपाळीने देण्यात यावे. ते एक वर्षासाठी असावे आणि संघाच्या बैठकाही वेगवेगळ्या देशात आलटूनपालटून व्हाव्यात. राष्ट्राराष्ट्रांतील राजकीय किंवा आर्थिक विवाद संघासमोर मांडल्याने सुसंस्कृत आणि घटनात्मक रीतीने स्थापन केलेल्या राष्ट्रातील लोकांचे प्रश्न समजूतदारपणाने सोडवता येतील आणि त्यामुळे पिढ्यान्‌पिढ्यांना प्रदीर्घ शांतता आणि मैत्रभावनेची प्राप्ती होऊ शकेल.’’ राममोहन यांच्या ह्या चिरस्मरणीय ओळी पाहिल्या म्हणजे आपल्या लक्षात येते की, फार पूर्वी म्हणजे 1831 साली राममोहन यांनी राष्ट्राराष्ट्रांतील विवाद संपवण्यासाठी आणि जागतिक शांततेसाठी एका वरिष्ठ राष्ट्रसंघाची गरज आहे हे ओळखले होते हे स्पष्ट होते. त्यांनी लीग ऑफ नेशन आणि राष्ट्रसंघ (यूनो) यांच्या जन्माची जणू नांदीच म्हटली असून जागतिक पातळीवरच्या कोणत्याही राजकीय विचारवंताच्या स्वप्नातही हा विचार तोपर्यंत आलेला नव्हता.

# 9

## पत्रकारांचे अग्रदूत

राममोहन यांच्या कार्यामुळे देशामध्ये सुधारणेची व जनजागरणाची मोठी लाटच आली. ह्या सुधारणा बहुपेडी व विविधांगी होत्या – उदा. सामाजिक, राजकीय, शैक्षणिक, आर्थिक, धार्मिक इ. ह्या सर्व गोष्टींना व्यक्त करून लिखित स्वरूपात सर्वांसमोर आणण्यासाठी राममोहन यांना मुक्त व स्वतंत्र विचारांच्या वर्तमानपत्राची/छापखान्याची निकड भासली. ह्या गरजेपोटी मग बंगालमध्ये व विशेष करून कलकत्तामध्ये छपाई उद्योग व वर्तमानपत्रांचा उगम आणि विकास झाला.

कलकत्ता येथे 1816 साली सुरू झालेले 'बंगाल गॅझेट' हे बंगाली भाषेतले पहिले उदारमतवादी साप्ताहिक वर्तमानपत्र होय. राममोहन यांच्या आत्मिय सभेच्या सदस्यांनी सुरू केलेले हे साप्ताहिक 1820 पर्यंत अस्तित्वात होते.

श्रीरामपूरच्या ख्रिश्चन मिशनऱ्यांनी 'समाचार दर्पण' हे बंगाली साप्ताहिक 1817 मध्ये सुरू केले. त्याचबरोबर त्यांनी एक इंग्रजी मासिक 'Friend of India' हेही सुरू केले. इंग्रजी भाषेतील पहिले उदारमतवादी वर्तमानपत्र 'कलकत्ता जर्नल' हे जेम्स सिल्क बकिंगहॅम यांनी ऑक्टोबर 1918 मध्ये प्रकाशित केले.

ताराचंद दत्त व भवानीचरण वेदोपाध्याय यांनी 1820 मध्ये 'संवाद कौमुदी' हे बंगाली साप्ताहिक सुरू केले. भवानीचरण यांनी राजीनामा दिल्यावर राममोहन यांनी संपादकपदाची जबाबदारी स्वीकारली.

राममोहन यांनी 'मिरात–उल–अखबार' हे फारसी भाषेतील साप्ताहिक सुरू केले. 1823 पर्यंत ते प्रकाशित होत होते.

'समाचार चंद्रिका' हे हिंदू सनातनवादाचे मुखपत्र होते.

डॉ. आर. एम. मार्टिन यांनी मे 1829 मध्ये 'बेंगॉल हेरॉल्ड' सुरू केले. वैद्यकीय व्यवसायात असलेल्या मार्टिन यांच्यावर श्री. द्वारकानाथ टागोर यांचा प्रभाव होता. श्री. राममोहन रॉय आणि श्री. द्वारकानाथ टागोर हे 'बेंगॉल हेरॉल्ड'चे संचालक होते. नीलरत्न हलदार हे राममोहन यांचे एक अनुयायी होते. त्यांनी 'बंगदूत' नावाच्या साप्ताहिकाचे बंगाली, पर्शियन व हिंदी अशा तीन भाषांमध्ये संपादन केले.



सॅम्युअल स्मिथ नामक एक पुस्तक विक्रेता व प्रकाशक असलेल्या माणसाने 'बेंगॉल हरकारा' सुरू केले. ह्या नियतकालिकास श्री. द्वारकानाथ टागोरांनी मोठ्या प्रमाणावर अर्थसाहाय्य केले. 'द इंडियन गॅझेट' 1831 मध्ये सुरू झाले. त्या काळचे एक प्रमुख इंग्रजी वर्तमानपत्र असलेल्या ह्या गॅझेटचे श्री. द्वारकानाथ टागोर हे मालकांपैकी एक होते.

'जॉन बुल' नावाचे निमसरकारी व उदारमतवादाच्या विरोधासाठी कुख्यात असलेले एक वृत्तपत्र 1821 मध्ये सुरू करण्यात आले होते. 1832 मध्ये श्री. द्वारकानाथ टागोर यांच्या मदतीने त्यांचाच एक मित्र स्टॉकिलर याने हे वर्तमानपत्र विकत घेतले. नंतर त्या पेपरचे नाव बदलून 'इंग्लिशमन्' असे करण्यात आले.

जाता जाता हे सांगावेसे वाटते की, द्वारकानाथ टागोर, म्हणजे रवींद्रनाथांचे आजोबा हे एक असामान्य बुद्धिमत्ता, संपन्नता आणि प्रभावशाली व्यक्तिमत्त्व असलेले गृहस्थ होते. ते सहिष्णुता व औदार्याच्या भावनेने ओतप्रोत भरलेले होते. राममोहन यांचे ते प्रशंसक व जिवलग मित्र होते. राममोहन यांना त्यांच्या सर्व सुधारणावादी चळवळीमध्ये श्री. द्वारकानाथ टागोर यांचा संपूर्ण आणि नैष्ठिक पाठिंबा मिळाला. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी 'लिबरल प्रेस ऑफ कलकत्ता' ह्या संस्थेच्या स्थापनेमध्ये श्री. द्वारकानाथांचा सिंहाचा वाटा होता. राममोहन यांनी सुरू केलेल्या चळवळीला पोषक असे जनमत निर्माण करणे व त्या दृष्टीने जनतेला शिक्षित करणे ह्या प्रमुख उद्देशाने ही संस्था स्थापन करण्यात आली होती. जॉर्ज थॉम्पसन हे ब्रिटिश पार्लमेंटचे सदस्य एक उदारमतवादी राजकारणी व प्रसिद्ध वक्ते अशी त्यांची ख्याती होती. श्री. द्वारकानाथ टागोरांनी आमंत्रित केल्यामुळे ही प्रसिद्ध व्यक्ती भारतात आली. राममोहन यांनी सुरू केलेल्या राजकीय उदारमतवादाला आपल्या भाषणांमधून बळकटी आणण्याचे काम थॉम्पसन यांनी केले. बंगाली वृत्तपत्र समुदायावर राममोहन यांच्या कार्याचे फार मोठे उपकार आहेत. त्याचबरोबर श्री.द्वारकानाथ टागोरांच्या उदारमतवादी दूरदर्शी औदार्याचे ऋणही मान्य करावेच लागेल.

# 10

## आर्थिक सुधारणा

भारतीय माणसाच्या आर्थिक दुर्दशेचे भानही राममोहन यांना होते. भारतीयांना त्यांच्या दयनीय अशा आर्थिक दुर्दशेतून बाहेर काढण्यासाठी राममोहन यांनी अविरत परिश्रम केले. पार्लमेंटरी समितीपुढे 1832 साली झालेल्या भाषणात ते म्हणाले, "जमीन कसणारा शेतकरी वर्ग फार हलाखीच्या परिस्थितीमध्ये आहे. ते सर्व लोक जमीनदारांच्या महत्त्वाकांक्षा क्रोधाला बळी पडत आहेत. जमीनदारांनी एकीकडे सरकारशी हातमिळवणी करून स्वत:पुरती महसुलाच्या मोजणीमध्ये सूट मिळवली. दुसरीकडे गरीब शेतकऱ्यांच्या हातात मात्र काहीच पडू दिले नाही." 1793 च्या परमानन्ट सेटलमेन्ट कायद्याप्रमाणे केवळ मोठ्या जमीनदारांना भरघोस फायदा झाला असून गरीब शेतकरी हा नाडला गेला आहे, हे राममोहन यांच्या लक्षात आले होते.

शेतसारा इतका बेसुमार वाढवला होता की, वर्षभर श्रम करूनही शेतकऱ्याच्या हातात काही उरत नसे. केवळ शेतसाऱ्यामध्ये वाढ करण्यावर बंदी आणून भागणार नसून, आहे तो शेतसाराही कमी करावा अशी मागणी राममोहन यांनी जोरदारपणे केली. 'शेतकरी व जमीनदारांमधील ह्या समस्येचे कायमस्वरूपी समाधान काढणे आवश्यक आहे, ज्यामुळे शेतसारा अवाजवीपणे वाढवला जाणार नाही व गरीब शेतकऱ्यांची पिळवणूक होणार नाही' अशी मौलिक सूचना राममोहन यांनी केली. शेतसारा एका विशिष्ट रकमेएवढाच सुनिश्चित केल्यामुळे आर्थिक तूट येण्याची शक्यता आहे. त्याची भरपाई करण्यासाठी चैनीच्या वस्तूवरील कर वाढवणे अथवा गलेलठ्ठ पगार घेणाऱ्या युरोपियन अधिकाऱ्यांऐवजी भारतीय लोकांना कलेक्टर्स म्हणून नेमणे असे उपाय राममोहन यांनी सुचविले. त्या काळात गावातील बाजारपेठांवरही जमीनदारांची मालकी असायची. तेथे शेतमाल व भाजीपाला विकण्यासाठी आलेल्या शेतकऱ्यांकडून हे जमीनदार लोक मोठी करवसुली करून त्यांना लुबाडत असत. राममोहन यांनी जमीनदारांनी चालवलेल्या ह्या शोषणाविरुद्ध चळवळ सुरू केली.

मिठाच्या विक्रीचे एकाधिकार ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरांना होते. ह्या एकाधिकाराविरुद्ध राममोहन यांनी लढा दिला. मिठाच्या मूळ किंमतीपेक्षा एक हजार टक्क्यांनी किंमत



वाढवली गेली होती. मिठाच्या निर्मिती प्रक्रियेत जवळपास एक लाख पंचवीस हजार कामगार काम करत होते. त्यांना 'मोलंगी' असे संबोधले जाई. हे मोलंगी अक्षरश: दारिद्र्यात खितपत पडलेले होते. त्यांना 'गुलाम' म्हणून वागवण्यात येत होते. ह्या मिठाच्या निर्मितीसाठी सरकारने एजंट नेमलेले होते. मग हे मीठ कलकत्त्याला विक्रीसाठी नेले जाई. तिथे मिठाचे ढीगच्या ढीग विकले जात. हा व्यवसाय काही मोजक्याच पण सधन भारतीयांच्या हातात होता. हे व्यापारी साठेबाजी करून मिठात भेसळ करून मग विकत असत. परदेशातून आलेल्या मिठावर मोठ्या प्रमाणात आयात करही लागू होता.

राममोहन यांनी मिठाच्या एकाधिकारशाहीचा विरोध करण्यासाठी एक चळवळ उभी केली. त्यासाठी त्यांनी खालील मुद्दे मांडले – (अ) मिठाची किंमत जर कमी केली तर त्याची मागणी वाढेल. (आ) मिठाची कमतरता सर्वांनाच जाणवत होती. (इ) इंग्लंडहून मीठ आयात करावे, कारण ते स्वस्त व सरस प्रतीचे होते. (ई) मोलंगी लोकांना शेती व्यवसायात सामावून घेतले जावे. (उ) मिठातील भेसळीचे प्रमाण इतके वाढले होते, की सर्वसामान्य ग्राहकाच्या हाती निव्वळ मातीच येत होती. संसदीय निवड समितीनेसुद्धा राममोहन यांच्या एकाधिकार विरोधी भूमिकेला पाठिंबा दिला. त्यांच्या चळवळीचे फलित हे, की ईस्ट इंडिया कंपनीचे मिठाचे एकाधिकार काढून घेतले गेले.

'इंग्रजांनी भारताचे आर्थिक शोषण अत्यंत सुनियोजितपणे चालवले आहे' ही गोष्ट सर्वप्रथम राममोहन यांच्या लक्षात आली होती. भारतीयांनी याकडे लक्ष द्यावे असे त्यांना वाटत होते. येथील राज्यकर्ते करवसुलीच्या स्वरूपात या देशाचे आर्थिक शोषण करत होते. 'भारताची महसूल पद्धती' ह्या विषयावरील एका प्रश्नाच्या उत्तरात राममोहन यांनी एक धक्कादायक गोष्ट सांगितली की, भारतातून सेवानिवृत्त झालेले युरोपियन अधिकारी स्वत:सोबत प्रचंड प्रमाणात संपत्ती घेऊन जात होते. आपला मुद्दा सिद्ध करण्यासाठी त्यांनी एक तक्ताच बनवला. त्याच्या आधारे भारतीय संपत्तीची लूट सहज सिद्ध करता येत होती. ते लिहितात, "मे. लॉयड व मेलव्हिने हे ईस्ट इंडिया कंपनीचे अनुक्रमे वरिष्ठ लेखापाल व वरिष्ठ अंकेषक आहेत. त्यांनी दिलेल्या माहितीवरून असे सिद्ध होते की, निवड समितीच्या 23 फेब्रुवारी 1830 च्या बैठकीच्या नोंदीवरून अशी माहिती मिळते की, भारताच्या एकूण प्राप्त महसुलापैकी तीन अब्ज पाऊंड्स हे भारतात सेवेला असलेल्या युरोपियनांवर खर्च होतात. तो खर्च खालील बाबींवर होतो – (अ) सुकाणू समिती व इंडिया हाऊसचा खर्च. (आ) वेतन (इ) लष्करी व नागरी विभागात भारतासाठी सेवेत असलेले युरोपियन्स यांच्या अनुपस्थिती भत्ते व निवृत्ती वेतनावरील खर्च (ई) त्यांना दिले गेलेले व्याज.

या व्यतिरिक्त 4,53,588 पाऊंड्सचा जादा खर्च भारतासाठी असलेल्या टेरिटोरियल स्टोअरसाठी. 28 जून 1810 रोजी बंगाल सरकारच्या संचालक मंडळाला एक महत्त्वाचे

पत्र मिळाले. ते पत्र एका सक्षम आणि कंपनीमध्ये सन्मानाची जागा भूषविणाऱ्या कंपनीच्याच एका कर्मचाऱ्याने लिहिले होते. संचालक मंडळाने ह्या पत्राचे महत्त्व ओळखून ते पत्र 'भारताला लागू असलेल्या वसाहतवादी धोरणासंबंधी' ह्या पुस्तकात उद्धृत करावे असे म्हटले. ह्या पुस्तकाचे लेखक व संचालक मंडळाचे सदस्य यांनी लिहिले आहे, "लंडनहून आलेल्या व्यक्तिगत देयकांची दरवर्षीची भरणा रक्कम ही दोन अब्ज पाऊंड्स इतकी असून हा खर्च गेल्या कित्येक वर्षांपासून सतत चालू आहे." (पान 70) या व इतर अधिकृत माहितीच्या आधारे लेखकाने एकंदर रक्कम मोजली. तर 'सार्वजनिक व खासगी खर्चाच्या नावे 1765 ते 1820 च्या दरम्यान भारतातून वसूल झालेली रक्कम जवळपास 100 अब्ज पाऊंड्स' इतकी होते, असे लिहिले आहे.

त्या काळी इंग्लंडमध्ये मुक्त व्यापार पद्धती व एकाधिकार पद्धती यांच्यामधे प्रचंड स्पर्धा चालू होती. या स्पर्धेतील मुक्त व्यापार धोरणाला राममोहन यांनी पाठिंबा दिला व एकाधिकार व्यापार पद्धतीचा विरोध केला. राममोहन यांच्या या विचारांचे श्री. द्वारकानाथ टागोरांनी समर्थपणे समर्थन केले. या संदर्भात दोघांचाही दृष्टिकोण असा होता की, भारताशी व्यापार-व्यावसायिक संबंध प्रस्थापित करून ब्रिटिश लोक एक ऐतिहासिक कार्य पूर्ण करीत होते आणि ते म्हणजे अनेक दशकातील मुस्लिम राज्यकारभारामुळे भारतीय जनतेमध्ये जी निष्क्रियता व साचलेपण आले होते त्यातून ते भारतीयांना बाहेर काढीत होते. भारत जागतिक ऐतिहासिक प्रवाहापासून बराच काळ वेगळा व एकाकी राहिलेला होता. भारताला जागतिक प्रवाहाच्या प्रत्येक क्षेत्रात ढवळून काढणाऱ्या ऐतिहासिक शक्तीचे प्रतिनिधित्व इंग्लंड करीत होते. भारतीय अस्तित्वाच्या प्रत्येक क्षेत्रात बदल घडून आले ते या शक्तीमुळेच. आर्थिक क्षेत्रामध्ये तर औद्योगिक क्रांती आणण्याचे काम निर्विवादपणे इंग्रजांनी केले. इंग्रजांनी बंगालच्या खेड्यापाड्यांमधून कारखाने सुरू करावेत म्हणजे सामान्य जनता जमीनदारांच्या अत्याचारांतून मुक्त होईल असा ठाम विश्वास राममोहन व द्वारकानाथ या दोघांनी व्यक्त केला. अर्थात हा बदल काही सहज होणारा नव्हता. ही प्रक्रिया अर्थातच परिवर्तनाला क्रूरपणे विरोध करणाऱ्या सर्वच क्षेत्रातील प्रक्रियेप्रमाणे त्या परिस्थितीचाच एक भाग होती. पण ही अटळ होती. कोणत्याही देशात जमीनदारी आर्थिक व्यवस्थेतून भांडवलशाही अर्थव्यवस्थेकडे जातानाचा प्रवास सहज, सोपा व मवाळपणाचा झालेला नाही. भारतातही तेच घडले. राममोहन यांनी ह्या आर्थिक क्रांतीला पाठिंबा दिला. त्यात त्यांचे मित्र द्वारकानाथ टागोर हेही प्रामाणिकपणे त्यांच्यासोबत होते.

## 11.

# ब्रह्मसभा व ब्राह्मो समाज

1827 मध्ये रे. विल्यम अॅडम यांनी आर. ड्युटन यांना उद्देशून लिहिलेल्या एका पत्रात युनिटेरियन असोसिएशनबाबत खालीलप्रमाणे उल्लेख केला आहे, "सध्या ह्या असोसिएशनचे सदस्य याप्रमाणे आहेत —

थिओडोर डिकन्स नावाचे वकील, जॉर्ज जेम्स गॉर्डन नावाचे मॅकिंटॉष आणि कंपनीचे एक व्यापारी, विल्यम टेट नावाचे अॅटर्नी, बी. डब्ल्यू. मॅक्लीड नावाचे सरकारी सेवेतील शल्यचिकित्सक, कंपनीमध्ये काम करणारे नॉर्मन केर, राममोहन रॉय, द्वारकानाथ टागोर, प्रसन्नकुमार ठाकूर, राधाप्रसाद रॉय (राममोहन यांचे ज्येष्ठ पुत्र) व मी स्वतः."

पण कालांतराने ही असोसिएशन बंद पडली. ह्या अपयशानंतर राममोहन व त्यांच्या सहकाऱ्यांना एकीकरणवादी व एकेश्वरवादी उपासना पद्धतीला वाहून घेणाऱ्या एका संस्थेची स्थापना करणे गरजेचे व अत्यावश्यक वाटू लागले. राममोहन यांचे एक अनुयायी श्री. चंद्रशेखर देव यांनी राममोहन यांना अशी विनंती केली की, त्यांच्या एकीकरणवादी विचारांच्या लोकांच्या बैठका निर्धोक घेण्यासाठी एक विशेष, स्वतंत्र अशी जागा घ्यावी. चंद्रशेखर देव यांची सूचना मान्य करून राममोहन यांनी 20 ऑगस्ट 1820 रोजी ब्रह्मसभेचे उद्घाटन केले. चंदरनगरचे रहिवासी राम कमल बसू यांच्याकडून एक घर किरायाने घेतले गेले. हे बसू कलकत्त्यामध्ये 'फिरंगी कमल बसू' म्हणून प्रसिद्ध होते, कारण त्यांचे युरोपियनांशी व्यापारी संबंध होते. 48, चितपूर रोडवरील हे घर म्हणजेच ब्रह्मसभेचे पहिले निवासस्थान होय. सभेचे पहिले सचिव म्हणून राममोहन यांचे एक अनुयायी ताराचंद चक्रवर्ती यांची नेमणूक करण्यात आली. दोन वर्षे भाड्याच्या जागेत राहून सभेचे कामकाज चालले. नंतर 23 जानेवारी 1830 रोजी सभेच्या कामकाजासाठी जागा विकत घेण्यात आली. ह्या सभेला प्रतिक्रिया म्हणून पुराणमतवादी हिंदूंनी 'धर्मसभे'ची स्थापना केली. या सभेचे प्रमुख हे राधा कांत देव नावाचे पुराणमतवादी हिंदूंचे मान्यताप्राप्त असे नेते होते.

२३ जानेवारी 1830 रोजी ब्रह्मसभेचे स्वतःच्या जागेत स्थलांतर झाले. ह्या नवीन जागेच्या उद्घाटन सोहळ्याला माँटगोमेरी मार्टिन नावाचे एकमेव युरोपियन गृहस्थ उपस्थित होते. त्यांनी ह्या घटनेचा अत्यंत रोचक असा वृत्तांत आपल्या 'हिस्ट्री ऑफ ब्रिटिश

कॉलनीज' ह्या पुस्तकात दिला आहे. त्यावरून समजते की, जवळपास 500 हिंदू लोक त्या उद्घाटन सोहळ्याला आले होते. ह्या उद्घाटनापूर्वी 5 जानेवारी 1830 ला राममोहन यांनी एक विश्वस्त पत्र तयार केले. हा फार महत्त्वाचा दस्तावेज असून वैश्विकता व सार्वभौमत्वाच्या संदर्भात हे एक अद्वितीय असे पत्र आहे. त्यातील उतारा याप्रमाणे आहे –

"विश्वस्त मंडळाकडे ही जागा सोपवण्यात येत आहे. विश्वस्त मंडळाचे लोक ही जागा, जमीन, इमारत, परिसर, या परिसरातील वाढीव बांधकाम, त्यातील उपयोगी सामान, वस्तू इ. लोकांना राहण्यासाठी, आनंदाच्या सोहळ्याप्रसंगी उपयोगासाठी, सार्वजनिक सभेच्या आयोजनासाठी उपलब्ध करून देतील. अशा प्रकारे ही जागा सर्व प्रकारच्या लोकांसाठी, कोणताही भेदभाव न बाळगता उपलब्ध करून दिली जाईल. त्याचबरोबर हे विश्वस्त लोक इतरांशी शांतपणाने, आदराने, सौम्यपणाने, धार्मिकतेने वागतील, कारण हे ठिकाण 'त्या' जगन्नियंत्या, जगाचा निर्माता असलेल्या अढळ, अगम, अशा वैश्विक शक्तीच्या उपासनेचे स्थान आहे; प्रार्थनेचे स्थान आहे. ह्या पवित्र स्थानी आल्यावर कोणाचाही अपमान होणार नाही, उपहास होणार नाही, अथवा अपशब्द वापरले जाणार नाहीत. मग ती व्यक्ती असो वा व्यक्तिसमूह असो, कोणत्याही धार्मिक पंथाचे असोत अथवा विविध प्रार्थना, पूजा-प्रकार अवलंबिणारे असोत. विश्वस्त ह्या गोष्टीकडे कटाक्षाने लक्ष देतील. कारण हे सर्व जण विश्वाच्या निर्मात्याचे उपासक असून चिंतनशील प्रवृत्तीचे आहेत. नैतिकता, धर्मादाय, क्षमाशीलवृत्ती, परोपकारी वृत्ती, सद्गुण इत्यादींना चालना देणारे हे लोक आहेत. वेगवेगळ्या धार्मिक मान्यता व जातींच्या लोकांमध्ये एकात्मतेचे बंध दृढ करणारे हे 'महात्मे' आहेत."

विश्वस्तासाठीच्या ह्या संलेखावरून (ट्रस्ट डीड) हे स्पष्ट होते की, राममोहन यांच्या चिंतनाप्रमाणे ब्रह्मसभा म्हणजे काही वेगळी धार्मिक अस्तित्व असलेली संस्था नव्हती. उलट सगळ्या धर्मांमधील एकेश्वरवाद्यांनी ब्रह्मसभेचा हा परिसर स्वत:चा म्हणून वापरावा, असे राममोहन यांना अभिप्रेत होते. निर्गुण, निराकार, शाश्वत, अनादी अनंत अशा ईश्वरावर ज्यांचा विश्वास आहे; मग ते कोणत्याही धर्माचे का असेनात, अशा सर्वांना एकत्रित करण्यासाठी ब्रह्मसभेचा वापर व्हावा असे राममोहन यांना वाटत असे. एकदा तर राममोहन आपल्या मित्राला असेही म्हणाले की, त्यांच्या मृत्यूनंतर हिंदूंनी त्यांच्या पार्थिवावर अधिकार सांगावा तर मुस्लिमांनी आपला अथवा ख्रिस्तांनी त्यावर आपला हक्क सांगावा, कारण ते स्वत: मात्र कोणत्याही जाती, धर्म, पंथाचे नसून ते वैश्विक धर्माचे पाईक होत. मुंबई विभागातील एक उदारमतवादी व सुधारणेच्या क्षेत्रात अग्रणी असलेले न्यायमूर्ती श्री. म. गो. रानडे ह्या ट्रस्ट डीडबद्दल म्हणाले, "ह्या दस्तावेजांमधून आपणाला मूर्तिमंत आध्यात्मिकता, सखोल धर्मपरायणता व वैश्विक सहनशीलता दिसून येते. त्याचबरोबर त्याचे देखणेपण व नेमकेपण इतके आहे की, लोकांना त्याचे महत्त्व समजावून घेण्यामध्ये कदाचित काही शतकांचा कालावधी लागेल." प्रसिद्ध भारतीय पत्रकार रामानंद चटर्जी म्हणाले, "ब्राह्मो समाजाची स्थापना करताना राममोहन रॉय यांची अशी धारणा होती की, ह्या 'समाजामधे' ईश्वराची प्रार्थना करण्याची मनोकामना असलेल्या सर्व पंथांच्या लोकांनी एकत्र यावे, आपापसात वैचारिक देवाणघेवाण करावी." ब्रह्मर्षी आर. वेंकटरत्नम आपल्या आस्तिकवादी संमेलनाच्या अध्यक्षपदावरून कलकत्ता येथे 1906 मध्ये बोलताना म्हणाले, "त्या अजरामर ट्रस्ट डीडमध्ये वर्णन केल्याप्रमाणे ब्राह्मो समाज म्हणजे आध्यात्मिक विश्वबंधुत्वाचा आविष्कार आहे. यामध्ये कोणत्याही प्रकारची कृत्रिम बंधने नाहीत अथवा ईश्वराच्या आराधनेत कोणत्याही पंथीय मान्यतेचा वरचष्मा नाही. ह्या समाजामध्ये विविध पंथ एकमेकांवर दोषारोप न करता माणसांमध्ये परस्पर एकोपा वाढवण्यास एकमेकांना मदत करतात. त्याचबरोबर समाजामध्ये सद्भाव, नैतिकता, धर्मपरायणता व परोपकाराची भावना वाढीस लागावी ह्या उद्देशाने ब्राह्मो समाजाची स्थापना झाली होती." 1 जुलै 1865 तारखेच्या 'इंडियन मिरर'मध्ये महान भारतीय समाजसुधारक केशव चंद्रसेन यांनी लिहिले, "राममोहन स्वत: कोण्या एका पंथाचे नव्हते. एखादा नवीन पंथ किंवा धर्म सुरू करण्याचाही त्यांचा मानस नव्हता. त्यांनी एका अपवादातीत विचारप्रणालीचा प्रारंभ केला. सर्व प्रकारच्या जाती, पंथ व धर्माच्या लोकांनी आपसातील मतभेद विसरून एकाच नित्य ईश्वराची उपासना वैश्विक पातळीवर करावी, ही राममोहन यांची महत्त्वाकांक्षा होती. अशा प्रकारे ते कोणत्याही एका धर्माचे नसून सर्व धर्मांचे पाईक होते; कोणत्याही एका चर्चचे सदस्य नसून सगळ्या चर्चेसचे सदस्य होते. युनिटेरियन उपासनेअंतर्गत एका विशाल व वैश्विक चर्चची निर्मिती करावी, अशी त्यांची महत्त्वाकांक्षा होती." ब्राह्मो–समाजाचे प्रचारक श्री. सतीशचंद्र चक्रवर्ती 27 सप्टेंबर 1933 रोजी आपल्या सामूहिक प्रार्थनेच्या शेवटी म्हणाले, "--- कारण की राममोहन यांच्या कल्पनेप्रमाणे हा (ब्राह्मो) समाज म्हणजे एखादा नवीन पंथ वा उपासना पद्धती नसून सर्व प्रकारच्या धार्मिक विचारांच्या लोकांनी एकत्र येऊन एकाच ईश्वराची उपासना करावी. अर्थात एकात्म भारताची निर्मिती करणे हा उद्देशही समाजाच्या स्थापनेमागे आहे. हिंदू, मुस्लिम अथवा ख्रिस्ती लोकांनी आपापल्या श्रद्धा कायम ठेवूनसुद्धा प्रार्थनेसाठी एकत्र यावे; हा त्यांचा दृष्टिकोण आणि त्यात असलेले त्यांचे द्रष्टेपण आपण सहसा लक्षात घेत नाही."

ब्राह्मो समाजाचे महत्त्व व मोठेपण दर्शविण्यासाठी मी तत्कालीन भारतातील मोठमोठ्या विद्वानांची मते व प्रतिक्रिया इथे विस्तृत प्रमाणात दिल्या आहेत. पण वस्तुस्थिती अशी होती की, या ब्रह्मसभेचे नंतर जे 'ब्राह्मो समाजात' रूपांतर झाले, या निर्मितीमध्ये राममोहन यांचा वैचारिक अथवा कृतिशील सहभाग नव्हता. प्रसन्नकुमार टागोर यांच्या 'द रिफॉरमर ह्या वृत्तपत्राच्या 1831 च्या एका अंकात असे वाचावयास मिळते, "आपल्या अनेक बुद्धिमान सहकाऱ्यांना सोबत घेऊन राममोहन रॉय नावाच्या एका सुसंस्कृत व

प्रसिद्ध अशा व्यक्तीने 1828 मध्ये ब्रह्मसभा नावाची वेदांत संस्था स्थापन केली. ह्या सभेच्या बैठका दर शनिवारी चितपूररोड येथील एका प्रसिद्ध घरात होतात. वेदांतामधील शिकवण व ईश्वराच्या स्तुतीपर गीतगायनात हे लोक आपला वेळ घालवतात. ह्या मंदिरात होणाऱ्या धार्मिक विधींना ख्रिस्ती तथा इतर अनेक धर्मांच्या लोकांना उपस्थित राहण्याची परवानगी आहे.''

महर्षी देवेंद्रनाथ टागोरांनी स्थापन केलेल्या 'तत्त्वबोधिनी पत्रिका' ह्या नियतकालिकाच्या ऑक्टोबर 1847 च्या अंकात आपणास असा उल्लेख आढळतो, ''ह्या जागी कधीकधी मुस्लिम व ख्रिस्ती मुले ईश्वराची स्तुती फारशी व इंग्रजी भाषेतून करताना दिसत असत.'' याच पत्रिकेच्या 1854 च्या अंकात देवेंद्रनाथ टागोरांचे शिष्य व प्रसिद्ध लेखक अक्षयकुमार दत्त यांनी खालीलप्रमाणे लिहिले आहे,

''राममोहन यांच्या काळात ब्राह्मो समाजाचे आचार्य उपनिषद व इतर संस्कृत शास्त्र ग्रंथांमधील श्लोकांचे पठण करत असत व त्यांचा अर्थ सांगत असत, ईश्वराची पूजाही करत असत. हिंदूंच्या व्यतिरिक्त इतर समाजाचे लोकही ब्राह्मो समाजात येऊन ईश्वराबद्दल आदरभाव व्यक्त करणारे आपापल्या भाषेतील मंत्र म्हणत असत.''

याचा स्पष्ट अर्थ असा आहे की, ब्रह्मसभा, जिचे नंतर ब्राह्मो समाज असे नाव झाले, जर एका विशिष्ट धार्मिक पंथीयांची असती तर वेगवेगळ्या धार्मिक मतांचे लोक त्या ठिकाणी आलेच नसते व त्यांनी ही जागा आपल्या उपासनेसाठी निवडली नसती.

राममोहन भारत सोडून इंग्लंडला गेल्यानंतर 'ब्रह्मसभेचे' संचालन करणाऱ्या लोकांनी तिचे नाव 'ब्राह्मो समाज' असे केले. राममोहन यांनी कलकत्ता येथे राहणाऱ्या आपल्या मुलाला इंग्लंडहून पत्र लिहून एक भक्तिरचना त्यात पाठवली. त्यांनी 1830 मध्ये स्थापन केलेल्या 'त्या' ठिकाणी युनिटेरियन सभेत हे गीत म्हटले जावे अशी त्यांची इच्छा होती. ह्याच पत्रात त्यांनी 'ब्राह्मो समाज' ह्या शब्दाचा प्रथम उल्लेख केला, पण प्रथम ब्रह्मसभा आणि नंतर ब्राह्मोसमाज असा नामोल्लेख आढळतो. यावरून 'समाज' ह्या शब्दाचा वापर 'कोणत्याही एका पंथाचा' अशा अर्थाने न करता 'लोकांचे एकत्रीकरण' ह्या अर्थाने केला आहे हे निर्विवादपणे सिद्ध होते. 'समाज' हा शब्द त्याच अर्थाने आजही वापरला जात आहे.

ब्राह्मो समाज नावाच्या ह्या ईश्वरवादी संस्थेने जवळपास पंधरा वर्षे वेदांताची शिकवण दिली. त्या वेळी ब्राह्मो धर्म म्हणून वेगळा पंथ अस्तित्वात नव्हता. महर्षी देवेंद्रनाथ टागोर व इतर ज्ञानी पंडितांनी मिळून 1841 मध्ये उपनिषदे व काही धर्मशास्त्रांच्या ग्रंथांमधून निवडक तत्त्वे घेतली व ब्राह्मो धर्माचा पहिला ग्रंथ संपादित केला. जवळपास याच वर्षी तत्त्वबोधिनी सभेची एक बैठक झाली व या बैठकीत ब्राह्मो समाजाचे वर्णन 'वेदांतावर आधारित धर्म' ह्या शब्दांऐवजी 'ब्राह्मो धर्म' ह्या शब्दांत करावे असे प्रतिज्ञापूर्वक ठरले.



अशा प्रकारे 'ब्राह्मो धर्म' व 'ब्राह्मो चर्च' हे राममोहन यांच्या मृत्यूनंतर काही वर्षांनी अस्तित्वात आले.

जी. एस. लिनार्ड आपल्या 'ए हिस्ट्री ऑफ द ब्राह्मो समाज फ्राम इटस् राइस टू द प्रेझेंट डे' ह्या 1879 साली प्रकाशित झालेल्या पुस्तकात लिहितात, ''मी तर 'वैदिक श्रद्धा' ह्याच शब्दांना धरून आहे. हे शब्द बदलून नंतर 'ब्राह्मो धर्म' हे शब्द तत्त्वबोधिनी सभेत वापरले गेले. ही बैठक पौष एकादशी (1846 इ.स.) रोजी घेतली गेली ज्यामध्ये राजनारायण बोस यांनी हा बदल सुचवला व अक्षयकुमार दत्तांनी त्याला अनुमोदन दिले.''

ब्राह्मो नावाचे कोणतीही जात अस्तित्वात नव्हती. त्यामुळे 1841 पर्यंत ब्राह्मो कुलाचार किंवा रीतीरिवाज अस्तित्वात नव्हते हे साहजिकच आहे. ब्राह्मो समाजाच्या रीतिरिवाजानुसार पहिले लग्न 26 जुलै 1861 रोजी पार पडले.

राममोहन यांनी मोठ्या उदात्त दृष्टिकोनातून सर्व धर्मांतील एकेश्वरवादी लोकांना एकत्र येण्यासाठी ब्रह्मसभेच्या रूपाने एक संधी उपलब्ध करून दिली होती. परंतु राममोहन भारत सोडून इंग्लंडला गेले व त्यानंतर ब्रह्मसभा हळूहळू कमकुवत बनत गेली व त्यांच्या मृत्यूबरोबरच संपलीही. त्याची जागा ब्राह्मो समाजाने घेतली. ब्राह्मो समाज म्हणजे केवळ हिंदू एकेश्वरवाद्यांच्या भेटीचे ठिकाण बनले. राममोहन यांच्या समृद्ध कल्पनेच्या भरारीचे पंख अशा प्रकारे कापले गेले. हे कदाचित ऐतिहासिक विकासाच्या प्रक्रियेने नियंत्रित केले असावे अथवा ती त्या काळाची ऐतिहासिक गरज असावी. ते काहीही असले तरी राममोहन यांच्या विश्वात्मक व विशाल दृष्टिकोनाला नंतरच्या काळात हिंदू एकीकरणवाद्यांनी संकुचित करून केवळ आपल्यापुरताच असलेला ब्राह्मो समाज नावाचा 'धर्म' असे रूप दिले हे नमूद केले पाहिजे. आणि हा बदल घडवून आणण्यामध्ये देवेंद्रनाथ टागोरांची महत्त्वाची भूमिका होती हे मान्य केले पाहिजे.

# 12

## इंग्लंडमधील वास्तव्य

15 नोव्हेंबर 1830 रोजी राममोहन रॉय अल्बियन नावाच्या जहाजातून इंग्लंडच्या प्रवासाला निघाले. 8 एप्रिल 1831 रोजी ते इंग्लंडच्या किनाऱ्याला लागले. पण त्यांच्या प्रत्यक्ष जाण्यापूर्वीच त्यांचे नाव व प्रसिद्धी इंग्लंडला पोहोचली होती. 1816 मध्ये जेव्हा त्यांनी वेदांताचे संकलन 'ॲन ॲब्रीजमेंट ऑफ द वेदांता' या नावाने इंग्रजीमधून प्रकाशित केले होते तेव्हा या पुस्तकाचे परीक्षण विस्तृतपणे 'मंथली रिपोझिटरी ऑफ थिऑलॉजी ॲन्ड जनरल लिटरेचर' या नियतकालिकात प्रसिद्ध झाले होते. लोक त्यांना पाहण्यासाठी उत्सुक होते. 'लिव्हरपूल येथे राममोहन आले आहेत' असे कळताच जवळपास सर्वच मान्यवरांनी त्यांना भेटण्यासाठी धाव घेतली.

मिडिसीजचे सुप्रसिद्ध इतिहासतज्ज्ञ विल्यम रॉस्को त्या वेळी गंभीररीत्या आजारी होते तरीही त्यांनी राममोहन यांची भेट घेण्यासाठी आपल्या सुपुत्राला त्यांच्याकडे पाठवले. राममोहन रॉस्को यांना त्यांच्या शयनकक्षात जाऊन भेटले. दोघांमध्ये अत्यंत आत्मिय असा संवाद घडला. रॉस्कोंचे सुपुत्र ह्या भेटीचे साक्षीदार होते. ह्या भेटीसंदर्भात त्यांनी अत्यंत संस्मरणीय टिपण आपल्यासाठी करून ठेवले आहे, "ही मुलाखत कधीही न विसरता येण्यासारखी आहे. भारतीय पद्धतीने नमस्कार करून झाल्यावर राममोहन म्हणाले, "आपल्या भेटीने मी अत्यंत आनंदित झालो आहेच, मला माझाच गर्व वाटत आहे. गर्व याच्यासाठी की मी आज एका अशा व्यक्तीशी हस्तांदोलन करता आहे जो केवळ युरोपातच नव्हे तर संपूर्ण जगात प्रसिद्ध आहे." रॉस्को प्रत्युत्तरादाखल म्हणाले,

'मी ईश्वराचा आभारी आहे, कारण आज हा दिवस पाहण्यासाठी मी जिवंत आहे." बऱ्याच वर्षांपासून रॉस्को यांना पक्षाघाताचा त्रास होता. लवकरच त्यांचे निधन झाले. इंग्लंड भेटीमागे राममोहन यांचा तिहेरी उद्देश होता. त्या वेळचा दिल्लीसम्राट अकबर द्वितीय यांच्यावतीने इंग्लंडच्या राजाला एक स्मरणपत्र सादर करणे हा पहिला उद्देश. दुसरा म्हणजे सती जाण्याच्या पद्धतीचे निर्मूलन व्हावे ह्या संदर्भात आमसभेमध्ये एक निवेदन सादर करणे. तिसरा म्हणजे ईस्ट इंडिया कंपनीच्या सनदीचे जे आमसभेत नूतनीकरण होणार होते त्या दरम्यान इंग्लंडमध्ये उपस्थित असणे. आमसभेत त्यावेळी



सुधारणा कायद्याचे द्वितीय वाचन होणार होते व ह्या वेळी आपणास उपस्थित राहता यावे म्हणून राममोहन लागलीच लिव्हरपूलहून लंडनला रवाना झाले पण ते संध्याकाळी उशिरा लंडनला पोहोचले. प्रवासाचा फारच शीण आल्याने त्यांनी आराम घेणेच पसंत केले. त्याच वेळी एक इंग्रज तत्त्ववेत्ते जर्मी बेन्थहॅम त्यांना भेटावयास आले. पण राममोहन आराम करत असल्याचे पाहून त्यांनी हॉटेलच्या काऊंटरवर एक चिठ्ठी लिहून ठेवली, "जर्मी बेन्थहॅम, आपला मित्र राममोहन रॉयसाठी आले होते." ते राममोहन यांचे इतके प्रशंसक होते की अजून एका प्रसंगी जेव्हा त्यांनी चिठ्ठी लिहिली तेव्हा राममोहन यांचा उल्लेख, अत्यधिक गौरवास्पद आत्मिक प्रेमास पात्र व मानवतेच्या सेवेत माझा सहकारी असलेला, अशा शब्दात केला.

इंग्लंडला पोहोचल्यानंतर राममोहन यांनी दिल्लीच्या सम्राटाच्या वतीने सादर करावयाचे स्मरणपत्र ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालक मंडळाला लगेचच सादर केले. त्याचबरोबर त्यांनी हे स्मरणपत्र लंडनमधील अनेक महत्त्वाच्या व प्रभावशाली व्यक्तींनाही दाखवले. दिल्लीच्या सम्राटाचे सर्व हक्क जरी मान्य केले नाहीत तरीही त्यातला काही भाग मान्य केला गेला. 13 फेब्रुवारी 1833 रोजी झालेल्या बैठकीत संचालकांनी सम्राटास वार्षिक वाढीव भत्ता म्हणून तीन लाख रुपये मान्य केले.

लंडनमध्ये असताना राममोहन हे तेथील अतिमहत्त्वाच्या व्यक्तींना भेटण्यात, बैठका घेण्यात व राजकीय विषयांवर चर्चा करण्यामध्ये व्यस्त होते. इंग्लंडच्या राजाचे बंधू कंबरलँडचे ड्यूक यांनी हाऊस ऑफ लॉर्डसला राममोहन यांचा परिचय करून दिला. त्यांच्यापैकीच एक जेम्स सदरलँड यांनी असे लिहिले, "केवळ 'राजा' राममोहन यांच्या वैशिष्ट्यपूर्ण वक्तव्यामुळेच टोरी पक्षाच्या सरदार सदस्यांना इंडियन ज्यूरी कायद्याच्या विरोधी मतदान करण्यापासून परावृत्त करता आले." गुलामगिरीची प्रथा नष्ट करणे व शिक्षणाचा प्रसार करणे ह्या कार्यासाठी लॉर्ड ब्रोहॅम प्रसिद्ध होते. राममोहन यांचे अशा ब्रोहॅमशी घनिष्ठ मैत्रीचे संबंध स्थापित झाले. ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालकांनी 6 जुलै 1831 रोजी आयोजित केलेल्या शाही मेजवानीस राममोहन यांना खास निमंत्रण होते. ही मेजवानी लंडनच्या एका उंची हॉटेलमध्ये आयोजित केलेली होती. ह्या आयोजनाचे यजमानपद कंपनीच्या चेअरमन यांच्याकडे होते. त्यांनी राममोहन यांच्या दीर्घायुष्य व आरोग्याबद्दल प्रार्थना केली. त्याचबरोबर राममोहन यांनी केलेल्या भारतीयांच्या सेवेबद्दल प्रशंसोद्गार काढले. किंग विल्यम चतुर्थ यांच्या राज्यारोहण प्रसंगी युरोपच्या राजा-महाराजांच्या राजदूतांच्या बरोबरीने राममोहन यांना मानाचे स्थान प्राप्त झाले. लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटीने राममोहन यांना आपल्या वार्षिक सभेचे निमंत्रण दिले. त्या ठिकाणी राममोहन यांनी प्रसिद्ध पौर्वात्य अभ्यासक हेन्री थॉमस कोलब्रुक यांचे विशेष आभार मानले. राममोहन यांनी प्रसिद्ध मानवतावादी व समाजवादी अभ्यासक श्री. रॉबर्ट

ओवेन यांचीही भेट घेतली. या भेटीत ओवेन यांनी राममोहन यांना आपली मते पटवून देण्याचा प्रयत्न केला.

राममोहन जेव्हा इंग्लंडला पोहोचले तेव्हा तेथील राजकीय परिस्थिती रिफॉर्म बिलामुळे अत्यंत अस्थिरतेची झालेली होती. सारख्या चळवळी व निदर्शने होत होती. सर्वप्रथम हे बिल मार्च 1831 मध्ये सादर झाले व ते पहिल्याच टप्प्यावर नामंजूर झाले. या पराजयामुळे संसद बरखास्त झाली. नव्या संसदेने सुधारणा कायद्याचा नवीन मसुदा आमसभेत 26 सप्टेंबर 1831 मध्ये मान्य केला. पण ह्या दुसऱ्या मसुद्याला खास सभेच्या सदस्यांनी केराची टोपली दाखवली. पुन्हा एकदा तिसऱ्यांदा रिफॉर्म बिल हाऊस ऑफ कॉमन्सच्या समोर ठेवले गेले व ते मार्च 1832 मध्ये मंजूर करण्यात येऊन पुढील मान्यतेसाठी हाऊस ऑफ लॉर्डसकडे पाठवण्यात आले. इंग्लंडची जनता ह्या मुद्यावरून खवळून उठली होती व हाऊस ऑफ लॉर्डसच्या निर्णयाची कमालीच्या उत्सुकतेने श्वास रोखून वाट पाहत होती. या वेळी मात्र लॉर्डसना सर्वसाधारण जनतेच्या दबावाला बळी पडावे लागले व हे बिल जून 1832 मधे पास झाले. अशाच प्रकारचे उपाय आर्यलँड व स्कॉटलँडच्या बाबतीत केले गेले. रिफॉर्म बिल पास झाल्यामुळे राममोहन यांना अतिशय आनंद झाला. आपला आनंद त्यांनी विल्यम रायबोन यांना लिहिलेल्या पत्रात व्यक्त केल्याचे आपण यापूर्वीच पाहिले आहे.

फ्रान्सने ह्या जगाला 'स्वातंत्र्य', 'बंधुता' व समतेचा स्फूर्तिदायी संदेश दिला. अशा फ्रान्सबद्दल राममोहन यांच्या मनात गौरव आणि प्रशंसेचे भाव होते. त्यांनी खालील शब्दांमध्ये फ्रान्सची प्रशंसा केली,

"विज्ञान व कलागुणांच्या संवर्धनाने प्रतिष्ठित झालेला व यापेक्षाही महत्त्वाचे म्हणजे स्वत:ची राज्यघटना असण्याचे वरदान प्राप्त झालेला देश." राममोहन फ्रान्समध्ये प्रत्यक्ष जाण्यापूर्वीच म्हणजे जवळपास 1818 मध्येच त्यांचे नाव तिथे पोहोचलेले होते. फ्रान्समधील सुसंस्कृत लोकांच्या वर्तुळात त्यांच्या नावाची चर्चा आधीच सुरू झाली होती. 'द कलकत्ता टाइम्स'चे संपादक डी ॲकॉस्टा यांनी ब्लॉईसचे बिशप श्री. ॲबे ग्रेगोरी यांना राममोहन यांच्या धार्मिक लिखाणाच्या व तत्त्वज्ञानविषयक लिखाणाच्या प्रती पाठवून दिलेल्या होत्या. ह्याच ग्रेगोरी महोदयांच्या माध्यमातून 'राममोहन रॉय' हे नाव फ्रान्सच्या विद्वतजनांच्या सर्वतोमुखी झाले. ग्रेगोरींनी तर राममोहन यांच्या संदर्भात चक्क एक माहितीपत्रकच काढले. ते याप्रमाणे आहे, "आपल्या लिखाणांवर झालेले हल्ले परतवून लावताना हा माणूस (राममोहन रॉय) कमालीच्या आत्मसंयमाचा परिचय देतो. त्याची विधाने अत्यंत ताकदीची व ठोस असतात. हिंदू धर्माच्या सर्व धर्मग्रंथांचे त्यांना प्रगाढ ज्ञान आहे व हे सर्व गुण अंगी असणे हाच त्यांनी हाताशी घेतलेल्या कार्यासाठीच्या त्यांच्या योग्यतेचा मोठ्ठा पुरावा आहे. ह्या कार्यामध्ये त्यांना फार मोठा आर्थिक त्यागही करावा लागला व तो



राममोहन यांनी अगदी विरक्तभावाने केला. इतक्या टोकाच्या विरक्तभावाचे समर्थन व प्रोत्साहन करणेसुद्धा काहीसे अवघड काम आहे."

मॅडम मॉरीन यांनी 'इंडिया ॲन्ड द वर्ल्ड'च्या डिसेंबर 1933 च्या अंकात खालील महत्त्वपूर्ण नोंदी दिल्या आहेत, "फ्रान्समधील एशियाटिक सोसायटी ह्या संस्थेच्या दि. 7 जून 1824 च्या बैठकीमध्ये काही सदस्यांना स्वीकृत सदस्य म्हणून घेण्याच्या बाबतीत विचारविनिमय होत होता. त्यात राममोहन यांचे नाव मॉंसिए ला कोम्ते, दी हाटेरीन व बारन डी सासी यांनी औपचारिकरित्या सुचविले. हा प्रस्ताव नंतर ज्या एका समितीपुढे मांडण्यात आला तिचे सदस्य होते मॉंसिए लां जुईनाईस, बर्नॉफ क कल्प्रोत. 5 जुलै 1824 रोजी मि. कालप्रोत यांनी समितीच्या वतीने पंडित राममोहन रॉय यांच्या साहित्यिक दर्जाबद्दल माहिती पुरवली व त्यांच्या नावाचे सदस्यत्वासाठी समर्थनही केले. ह्या समितीच्या निष्कर्षाच्या आधारे शेवटी राममोहन रॉय यांना 'असोसिएट-करस्पॉंडंट'ची पदवी बहाल केली गेली."

एशियाटिक सोसायटीच्या मानद सदस्यत्वाची सनद राममोहन रॉय यांना व्यक्तिश: हस्तांतरित करण्याची जबाबदारी मि. लॅचलॅन नावाच्या निवृत्त इंग्रज अधिकाऱ्यावर सोपविण्यात आली होती. सिस्मॉडी यांनी 'रेव्ह एन सायक्लोपेडिक'च्या 1924 च्या अंकात राममोहन यांचे वर्णन खालील शब्दात केले, "ज्यांना भारताबद्दल काही माहिती आहे ते सर्व ह्या बाबत सहमत होतील की राममोहन रॉय हे सद्गुणी व सुसंस्कृत अभिजनांमध्ये सर्वतोपरी असलेले एक ब्राह्मण आहेत. आपल्या देशवासीयांनी एकमेव सत् ईश्वराची आराधना करावी, लोकांनी नैतिकता व धर्माची सांगड घालावी ह्यासाठी राममोहन रॉय हे अपार कष्टाचे डोंगर उपसत आहेत."

राममोहन रॉय यांनी फ्रान्सच्या राजाची भेट 14 ऑक्टोबर 1832 रोजी घेतली. मॉंसिए पॉथिअर यांनी डिसेंबर 1832 मध्ये एक निबंध प्रकाशित केला ज्यामध्ये राममोहन रॉय यांच्या विविधअंगी व्यक्तिमत्त्वाची व कार्याची विस्तृत चर्चा केली.

'दिल्लीच्या सम्राटाचे विशेष दूत म्हणून काम करण्याचा राममोहन रॉय यांचाच हक्क आहे,' असे ब्रिटिश सरकारने कालांतराने मान्य केले. इतकेच नव्हे तर दिल्लीच्या सम्राटाने राममोहन यांना बहाल केलेल्या 'राजा' ह्या पदविलादेखील सरकारने मान्यता दिली. सेंट जेम्सच्या राजवाड्यात 7 सप्टेंबर 1831 रोजी राममोहन रॉय यांना किंग विल्यम (चतुर्थ) यांची भेट घेण्याची परवानगी मिळाली. तद्नंतर राजाने लंडन ब्रीजच्या उद्घाटनाप्रीत्यर्थ आयोजित केलेल्या शाही मेजवानीसाठी राममोहन रॉय यांना आमंत्रित केले. इंग्रजांच्या उच्चभ्रू प्रतिष्ठितांच्या वर्तुळात राममोहन यांना मानाचे स्थान मिळाले. राममोहन यांचे स्वागत व सत्कार करण्यासाठी लंडनमध्ये अनेक कार्यक्रम आयोजित करण्यात आले व ह्या समारंभांना जर्मी बेथॅमसारखे अनेक मान्यवर लोक उपस्थित होते. ब्रिटिश युनिटेरियन

असोसिएशनच्या वतीने राममोहन यांचा एक सत्कार आयोजित केला होता. ह्या सभेत जर्मी बेथॅम यांचे जीवनचरित्र लिहिणारे डॉ. बॉरिंग यांनी राममोहन यांचे स्वागत याप्रमाणे केले, ''आज राममोहन रॉय आपणामध्ये उपस्थित आहेत. त्यांच्या येथील आगमनाने आमच्या हृदयात ज्या भावना व विचारांचा कल्लोळ झाला आहे त्या सर्वच्या सर्व इथे अभिव्यक्त करणे शक्य नाही याबद्दल मला खात्री आहे. ज्याने आपल्या जीवनात वर्षानुवर्षांच्या चढउतारांवर मात केली असून ज्याचा सन्मान काळानेही केलेला आहे – असा एक माणूस – एकदम जर आपणासमोर उपस्थित झाला तर आपल्या भावना काय असतील – आपणाला काय जाणवेल असा प्रश्न काही लेखकमित्र स्वत:लाच विचारत असतील. ते सर्व महत्प्रयासाने याचा विचार करत आहेत की जर प्लॅटो अथवा सॉक्रेटिस अथवा न्यूटनसारखे दिग्गज, विद्वत्जन आपणासमोर अचानक आले आणि त्यांचा सत्कार करण्याची संधी अनपेक्षितरीत्या प्राप्त झाली तर आपल्या भावना काय असतील. त्या सर्वांची जी भावनिक व मानसिक स्थिती होऊ शकते त्यातून मीही जात असून राजा राममोहन रॉय यांच्या दिशेने जेव्हा सर्वांच्या वतीने मी स्वागतासाठी माझा हात पुढे केला तेव्हा मी अत्यंत भावनावश झालो. हा माणूस आपणापर्यंत हजारो मैलांचे अंतर पार करून आला आहे. याच्या विचारांना आपण तितक्याच आस्थेने/आपुलकीने समजावून घेतले पाहिजे. ज्या पद्धतीने हजारो वर्षांपासून येथील अभ्यासू लोक वागत आले आहेत अशा अर्थाने पाहता माझ्या दृष्टीतून राजा राममोहन रॉय यांच्यामध्ये आणि आपल्यामध्ये भौगोलिक व काळाचे अंतर संपून गेले आहे.''

ह्या सत्कार समारंभाला अमेरिकेतील हॉवर्ड विद्यापीठाचे माजी अध्यक्ष डॉ. किर्कलॅंड हेही उपस्थित होते. ते या प्रसंगी म्हणाले, ''राजा राममोहन हे सध्या अमेरिकेत सर्वांच्या आकर्षणाचा विषय बनले असून तेथील लोक त्यांची मोठ्या आतुरतेने वाट पाहत आहेत.'' रेव्ह. डब्लू. जी. फॉक्स यांनीसुद्धा राममोहन रॉय यांची मुक्तकंठाने प्रशंसा केली. राममोहन यांनी आपल्याला मिळालेल्या मानसन्मानाला व सत्काराला उत्तर देताना जे भाषण केले त्याचे शेवटचे काही शब्द अतिशय प्रसिद्ध व संस्मरणीय ठरले. ते याप्रमाणे, ''जगामध्ये एक संघर्ष कायम चालत आलेला आहे. तो आजही आहे, तर्कबुद्धी व शास्त्रवचन, सारासार विवेक व संपत्ती, सत्ता व पूर्वग्रह यांच्यातील संघर्ष. ह्या तिघांचा आपापसात जरी संघर्ष असला तरीही मला खात्री आहे की, आज ना उद्या पहिल्या घटकांचा विजय निश्चित आहे--- म्हणजेच तुमचा विजय निश्चित आहे. तुम्ही वेळोवेळी अनेक मानसन्मानांचा माझ्यावर वर्षाव केला आहे --- हे मी माझ्या जीवनाच्या अंतापर्यंत कधीही विसरणार नाही.''

खरे म्हणजे राममोहन यांची प्रकृती अत्यंत दणकट होती, पण अतिपरिश्रम व आर्थिक चिंतेने त्यांची प्रकृती खालावत गेली. मेसर्स मॅकिंटोश आणि कंपनीचे दिवाळे



निघाले. राममोहन रॉय यांचे कलकत्ता आणि लंडन येथील एजंट मॅकिन्टॉशच होते. लंडन सोडून राममोहन रॉय यांनी ब्रिस्टलला जावे असा त्यांच्या हितचिंतकांनी आग्रह धरला. ब्रिस्टलमध्ये राममोहन यांचे डॉ. लॅंट कारपेंटर नावाचे एक मित्र होते. डॉ. कारपेंटर हे ब्रिस्टोल चॅपलचे पुरोहित होते. यांची एक आश्रित होती मिस कॅसल. तिच्याकडे राममोहन यांच्या राहण्याची व्यवस्था केली गेली. मित्रांच्या सहवासात त्यांना थोडे बरे वाटले. पण मग 19 सप्टेंबर रोजी अचानक त्यांचा आजार बळावला. डोकेदुखीबरोबरच फार मोठ्या प्रमाणात त्यांचा ताप वाढला. डेव्हिड हेअर यांच्या भगिनी मिस हेअर यांनी या काळात राममोहन यांची शुश्रूषा केली. अनेक नामवंत डॉक्टरांनी या काळात त्यांच्यावर उपचार केले, पण काहीही उपयोग झाला नाही. त्यांची प्रकृती वरचेवर वेगाने खालावतच गेली. 27 सप्टेंबर 1833 रोजी राममोहन अनंतात विलीन झाले.

डॉ. एस्लीन यांनी शेवटपर्यंत राममोहनांवर उपचार केले होते. त्यांनी राममोहन यांच्या जीवनाच्या शेवटच्या क्षणांचे वर्णन केले आहे ते असे, ''ती एक सुंदर चांदणी रात्र होती. मि. हेअर, मिस किड्डेल व मी असे तिघे जण खिडकीच्या एका बाजूला होतो. खिडकीबाहेर शांत मध्यरात्रीचा खेड्याचा परिसर दिसत होता, व खिडकीच्या आत मात्र एक अनन्यसाधारण व्यक्तीचा आत्मा हे जग सोडून जाण्याच्या तयारीत होता. 'तो' क्षण मी कदापि विसरू शकणार नाही. मिस हेअर यांनी राममोहन यांची बरीच सेवा केली होती, त्यांना औषधे व अन्नही भरवले होते, पण आता त्यांचा धीर खचला होता. त्यांनी आता राममोहनांच्या जीविताची आशा सोडून दिली व पराजित झाल्याप्रमाणे त्या राममोहन यांच्यापासून दूर जाऊन एका खुर्चीवर बसून हुंदके देऊ लगल्या. मृत्यूच्या जबड्यात जाणाऱ्या 'राजा'जवळ बसण्याचे धैर्य त्यांच्यामध्ये आता उरले नव्हते. जवळपास अडीच वाजता माझ्या खोलीत मि. हेअर आले आणि म्हणाले की, 'इट वॉज ऑल ओव्हर,' त्यांचा शेवटचा श्वास हा २.२५ वाजता निघून गेला.''

मिस कलेक्ट यांनी या संदर्भात लिहिले, ''त्यांनी उच्चारलेल्या अंतिम शब्दांमधे 'ओम्' हा महत्त्वाचा होता. ओम्काराचा उच्चार हा राममोहन यांच्या जीवनाचा अविभाज्य घटक होता, त्यांच्या दैनंदिन नित्यकर्माचा महत्त्वाचा भाग होता. या उच्चारामागे ईश्वराच्या नित्य आत्मिक चिंतनाचा भाग होता. म्हणूनच की काय मृत्यूच्या त्या महाद्वारासमोर निर्भयपणे उभे राहत असतानाही त्यांच्या ओठात ओम्काराचा उच्चार होता.''

स्टॅपल्टन ग्रोव्हमध्ये 18 ऑक्टोबर 1833 रोजी दुपारी दोन वाजता त्यांचे दफन झाले. उपस्थितांपैकी मेरी कारपेंटर बाईंनी ह्या घटनेचे अत्यंत हृदयस्पर्शी वर्णन लिहून ठेवले आहे, ''बऱ्याच वेळेपर्यंत अंत्ययात्रेची तयारी केली गेली. सर्वच्या सर्व हेअर कुटुंबीय लंडनहून आले. राजा राममोहन यांच्याशी ज्यांचे अत्यंत घनिष्ठ संबंध होते अशांनाच स्टॅपल्टन ग्रोव्ह येथे बोलावण्यात आले होते. त्यामध्ये मिस कॅसलचे पालक व

नातेवाईक होते, हेअर यांचे कुटुंबीय व त्यांची पुतणी जिने राममोहन यांची अगदी मुलीप्रमाणे देखभाल केली होती, राजाराम – त्यांचा दत्तक पुत्र व एक ब्राह्मण नोकर हे सर्व होते. दवाखान्याचे मि. एस्लीन स्वत:च्या आदरणीय मातोश्री व मुलीसोबत आले होते. त्याचप्रमाणे मी, माझ्यासोबत माझे वडील, डॉ. जेरार्ड व प्रसिद्ध व्यक्तिमत्त्व असलेले जॉन फॉस्टर हे सर्व उपस्थित होते. राममोहन रॉय या पवित्र आत्म्याच्या पार्थिव देहाला शवपेटिकेत ठेवण्यात आले. संथ गतीने, गंभीरपणे व प्रगाढ अशा शांतपणाने त्या खडकाळ मार्गाने सर्व शोकाकुल मित्रांच्या खांद्यावर ती शवपेटिका स्मशानभूमीकडे प्रवास करत होती. ह्या सर्वांचे राममोहन यांच्याशी अगदी शेवटच्या काळात ते जिवंत असताना घनिष्ठ संबंध निर्माण झाले होते. ज्या मार्गांवरून राममोहन स्वत: अनेक वेळा चालत गेले असतील त्याच मार्गाने ही अंत्ययात्रा चालली होती. शेवटी एका विशिष्ट ठिकाणी ही पवित्र पेटी टेकवण्यात आली. सर्वांच्या मनात विचार दाटून आलेले होते, पण छातीवर दगड ठेवून सर्वजण नि:शब्द उभे होते. जॉन फॉस्टर नंतर म्हणाले, ‘‘अशा वेळी कोण बोलू शकले असते?’’

ह्या घटनेच्या अनेक वर्षांनंतर म्हणजे 1842 मध्ये राममोहन यांचे मित्र व अनुयायी श्री. द्वारकानाथ टागोर इंग्लंडला गेले. त्यांनी राममोहन यांचे स्टॅपल्टन येथील थडगे हलवून ते अर्नोज व्हेलमध्ये स्थलांतरित केले. अर्नोज व्हेल ही ब्रिस्टोलच्या आसपास असलेली स्मशानभूमी आहे. तो दिवस होता 29 मे 1843 चा. त्यानंतर, म्हणजे 1844 मध्ये त्यावर एक उत्कृष्ट अशा भारतीय पद्धतीचे सुंदर बांधकाम करण्यात आले.

# 13

# राममोहन रॉय यांचा प्रभाव

राजा राममोहन रॉय यांचे इंग्रजीत चरित्र लिहिणाऱ्या सोफिया डॉक्सन कोलेट यांनी राममोहन रॉय यांचा त्यांच्या विदेशी चाहत्यांवर पडलेल्या एकूण प्रभावाचे वर्णन करताना म्हटले आहे की, ‘‘इतिहासाच्या एका टोकाला भारताचा अगम्य भूतकाळ व दुसऱ्या टोकाला अमर्याद भविष्यकाळ ह्या दोहोंमध्ये जिवंत सेतू म्हणून राममोहन रॉय उभे आहेत आणि त्यावरून भारतवर्षाची वाटचाल सुरू आहे. एका बाजूला जुनी झालेली जातिव्यवस्था, अंधश्रद्धा, हुकूमशाही, रूढीरिवाजांचे डोंगर, विकासाची पारंपारिक कल्पना, अनेकेश्वरवाद तर दुसऱ्या बाजूला आधुनिक मानवतावाद, विज्ञान, लोकशाही व एकेश्वरवाद ह्या दोन्ही बाजूंना जोडणाऱ्या महिरपीचे काम राममोहन रॉय यांनी केले. हे खडतर कार्य करण्यासाठी प्रसंगी त्यांनी एकाकी झुंज देऊन यातना सहन केल्या, दीर्घजीवी परंपरा व अटळ असा ज्ञानोदय यांच्यात असलेल्या परस्परविरोधी प्रवाहांना व्यक्तिगत पातळीवर सहन केले पण समाजामध्ये सुसंवाद निर्माण करण्यासाठी मध्यस्थाची भूमिका शेवटपर्यंत वठवली. नाना प्रकारच्या संस्कृती, श्रद्धा यांच्या मिश्रणाने निर्माण होणारे एक नवे व्यक्तिमत्त्व राममोहन रॉय साकार करतात. त्याचबरोबर जिज्ञासेचे स्वातंत्र्य, वैज्ञानिक ज्ञानाची भूक, विशाल मानवतावादी सहिष्णुता, शुद्ध विचार, भूतकाळाचा चिकित्सक पद्धतीने केलेला स्वीकार ह्या सर्व गोष्टी राममोहन यांच्यामध्ये साकार झालेल्या दिसून येतात. इतके असूनही त्यांचे व्यक्तिमत्त्व बंडखोरीचे नव्हते. परंतु त्यांच्या जीवनाचा अभ्यास केला असता हे स्पष्ट होईल की, त्यांच्या सर्व चळवळींच्या मुळाशी प्रामुख्याने धार्मिकता होती. वेगवेगळ्या भ्रमंतीच्या काळी राममोहन रॉय यांच्या मनातील श्रद्धेमुळेच त्यांना त्यांचा मार्ग सापडला. पुरातन हिंदुत्वाच्या भूमीत पुष्ट झालेले राममोहन एक असे रोपटे होते ज्याला आधुनिक विचारांचे खतपाणी मिळालेले होते. परंपरांचा विरोध करणाऱ्या वातावरणात ह्या रोपट्याने श्वास घेतलेला असला तरी याची पालवी मात्र हिंदुविचारांचीच होती. राजा राममोहन हे केवळ पाश्चिमात्यीकरण झालेले असे पौर्वात्य नव्हते. त्याचबरोबर वैचारिक, मानसिक गोंधळ उडालेल्या एखाद्या युरोपियन व्यक्तीसारखेही ते नव्हते. त्यांच्यासाठी कोणत्याही प्रकारचे आढेवेढे न घेता एक छोटेसे नाव वापरता येईल व ते म्हणजे ‘स्पिरिच्युअल

युरेशिअन' म्हणजेच आशिया आणि युरोपचे आध्यात्मिक एकीकरण. राममोहन यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासाचा मागोवा घेतला असता असे लक्षात येईल की, त्यांच्या विकासाचा मार्ग भूतकालीन पौर्वात्यवादापासून जरी सुरू झालेला असला तरी तो केवळ पाश्चिमात्य संस्कृतीच्या दिशेनेच न जाता त्याच्याही पुढे जातो. तो मार्ग एका अशा संस्कृतीकडे जातो जी पौर्वात्य अथवा पाश्चिमात्य नसून या दोहोंपेक्षाही विस्तृत, विशाल व उदात्त अशी आहे. त्यांच्या सर्व कार्यांमध्ये एक प्रकारचे सातत्य आहे जे त्यांना त्यांच्या धर्मामधून, श्रद्धेतून प्राप्त झाले आहे. हेच सातत्य त्यांना त्यांच्या प्रगतीवादी चळवळीसाठीसुद्धा एक शक्तिस्रोत म्हणून उपयोगी पडले. राममोहन यांच्या बाबतीत विचारांना जोडणारी व प्रतिरोध करणारी, त्याचप्रमाणे विस्तार करणारी व आकुंचित ठेवणारी अशी जर कोणती शक्ती असेल तर ती म्हणजे 'धर्म' होय.

अशा प्रकारे राममोहन यांचे जीवन म्हणजे नवभारतासाठी चेतना व स्फूर्ती देणाऱ्या स्थिर आणि प्रेरक अशा व्यक्तिमत्त्वाचा अभ्यास आहे. राजसत्तेचा प्रभाव असलेल्या ब्रिटिश जनतेला आणि नवी वाटचाल करणाऱ्या पाश्चिमात्य लोकशाहीला राजा राममोहन रॉय यांनी पौर्वात्य विचारांच्या आधारे देऊ केलेला संदेश निश्चितच कमी महत्त्वाचा नाही. भारतासाठी काळाच्या उदरात काय दडलेले आहे हे आज जरी सांगता येत नसले तरीही त्या येऊ घातलेल्या भविष्यकाळावर मोठ्या प्रमाणात राममोहन रॉय यांच्या जीवन व कार्याची छाप असेल यात संशय नाही. हा प्रभाव केवळ भारतापुरताच मर्यादित राहणारा नसून 'पूर्व' व 'पश्चिम' यांच्यावर सारखाच होणारा आहे, कारण आता ह्या दोहोंची सरमिसळ होणारच आहे. युरोपियन व आशियाई प्रवाहांनी एकमेकांवर आतापर्यंत बरीच टीका केलेली असली तरीही आता हे दोन्ही प्रवाह एकत्र येत असून मानवजातीच्या विकास सागरात हे प्रवाह एक नदी म्हणून अलगदपणे सामावून जातील. ह्या व अशा अगणित शक्यतांचा उदय आता जवळ आला असून याला कारण असलेल्या थोर व्यक्तींचे जीवनचरित्र आपण आताच अभ्यासले आहे. ते (राममोहन) अगदी प्रेषितांसारखे जरी नसले तरीही येऊ घातलेल्या बदलाची पूर्वसूचना देणारे ते अग्रदूत होते हे मात्र निश्चित.''

भारताच्या आधुनिक युगावर राममोहन यांच्या असलेल्या प्रभावाबाबत स्व. रवींद्रनाथ टागोरांचे शब्द म्हणजे एक प्रमाणपत्रच आहे. ते लिहितात, ''क्वचित आणि अभावानेच आढळणाऱ्या एखाद्या व्यक्तिमत्त्वाला समजावून घेणे व योग्य मूल्यांकन करणे यासाठी बराच वेळ जावा लागतो. विशेषत: अशा युगामध्ये जेव्हा त्या व्यक्तीच्या देशाच्या सर्वस्वाचे हरण झालेले असते व स्वत:च्या तेजस्वितेबद्दल परस्परविरोधी विचार प्रबळ झालेले असतात. संगीताच्या क्षेत्रातील एक उदाहरण यासंदर्भात देता येईल. राममोहन यांचे सच्चे स्वरही विसंवादी व दु:खद वाटू शकतात, कारण आजूबाजूच्या लोकांनी आपल्या संगीत वाद्यांच्या तारा इतक्या ढिल्या केलेल्या असतात, की जे स्वर कधीकाळी त्यांच्याच अत्यंत पवित्र व उच्च पातळी गाठलेल्या संगीताबरोबर, सत्याच्या स्वराबरोबर सामरस्य साधू शकत नाहीत. ऱ्हासाच्या संमोहाला हताशपणे चिकटून आपल्या थोर सांस्कृतिक वारशाचे जतन करण्याच्या जबाबदारीची आठवणसुद्धा नको म्हणणाऱ्या देशातील लोकांनी उद्धटपणे नाकारलेले व्यक्तिमत्त्व म्हणजे राजा राममोहन रॉय. पण प्रसंगच असा होता की, रागद्वेषाने भरलेल्या वातावरणातसुद्धा राममोहन यांचे आगमन अपरिहार्य असेच होते. बदलणाऱ्या ऋतूचे राममोहन रॉय प्रतिनिधी होते. प्रदीर्घ दुष्काळानंतर पावसाच्या सरी याव्यात आणि होरपळलेल्या वांझ जमिनीतून जीवनाचे वैभवशाली अंकुर फुटावेत तसे राममोहन रॉय यांचे आगमन होते. हे दृश्यांतर भयचकित करणारे होते. आणि याचा खरा अर्थ लक्षात येण्यास कालावधी जाणे आवश्यकच आहे. पीके कापणीला आल्यावरच नजरेत भरत असतात. कापणी करणाराही हे कबूल करताना संकोचत नाही. त्याप्रमाणे राममोहन रॉय यांचे आगमन म्हणजे त्यांच्या देशबांधवांसाठी अशी एक मौलिक घटना होती जी स्वागत करण्यास ते मानसिकदृष्ट्या तयारच नव्हते. ही घटना एकूणच वातावरणाच्या तुलनेत अमर्याद अशी होती. आणि तरीही राममोहन रॉय हे असे व्यक्तिमत्त्व होते, ज्याची इतिहास रात्रंदिवस वाट पाहत होता. एक असा माणूस की, ज्याचे जीवन म्हणजे तो ज्या मातीतून जन्माला आला तिच्या आत्म्याचे आणि कार्याचे तो पूर्णार्थाने प्रतिनिधित्व करीत होता. तसे ते एकाकी जीवनच होते, पण त्याच्यानंतर जे सहकारी आले ते सत्याचा मार्ग निर्भयपणे चोखाळणारे सत्यशोधक होते.

एका अंधकारमय, अराजक आणि संकुचित प्रांतवादाने बजबजलेल्या युगाने राममोहन यांच्यासारखी व्यक्ती देशाला एक प्रकारची देणगी म्हणून द्यावी ही गोष्ट अतिशय आश्चर्याची व अविश्वसनीय अशी म्हटली पाहिजे. आणि ही देणगीसुद्धा अशा लोकांना जे राममोहन यांना कधीच समजू शकले नाहीत. राममोहन हे एका अजोड बुद्धिमत्तेचे धनी होते. अत्यंत उदारपणे, सहानुभूतीने व योग्य आकलनक्षमतेद्वारे ते पौर्वात्य व पाश्चिमात्य आकांक्षांमधील सर्वोत्कृष्ट गोष्टींचा वेध घेऊ शकत होते. त्यांच्या बुद्धिमत्तेने स्वत:मध्ये वेगवेगळ्या संस्कृतींचा असा काही मोकळेपणाने संगम होऊ दिला, की ज्या संगमावर नानाप्रकारच्या संस्कृतींमधील महत्त्वाचे क्षण अलगद तरंगत आले. आधुनिक काळाचे दृश्य त्याच्या विविध हक्क आणि कार्यांसह त्यांच्या मन:चक्षूसमोर स्पष्ट होते. कदाचित काळाच्याही लक्षात न आलेले हे सर्व राममोहन रॉय यांनी आपल्या देशबांधवांसमोर काळाच्या कितीतरी आधी अधिकृतरीत्या ठेवले.

●●●

## राममोहन रॉय यांच्या जीवनातील महत्त्वाचा घटनाक्रम

1772 : 22 मे रोजी राधानगर येथे जन्म.

1809 : रंगपूरच्या कलेक्टर जॉन दिग्वी यांचे दिवाण म्हणून नेमणूक.

1815 : कलकत्त्यास वास्तव्य. आत्मीय सभेची स्थापना. बंगाली भाषेत 'वेदांत ग्रंथ'चे प्रकाशन.

1816 : 'संक्षिप्त वेदान्त किंवा 'वेदान्त सार' या ग्रंथाचे बंगाली, हिंदुस्तानी आणि इंग्रजीत प्रकाशन, 'किनोपनिषद' व 'ईशोपनिषदाचे' बंगाली व इंग्रजीत भाषांतर.

1817 : हिंदू कॉलेजची स्थापना. 'माण्डुक्यो उपनिषद' व 'कठोपनिषदा'चा बंगालीमध्ये अनुवाद.

1818 : 'सती' ह्या विषयावरील पहिला लेख प्रकाशित.

1820 : 'दि प्रिसेप्टस् ऑफ जीझस्' प्रकाशित.

1821 : रेव्ह. विल्यम ॲडम यांनी युनिटेरिॲनियमचा स्वीकार केला, 'संवाद कौमुदी'ची सुरुवात.

1822 : 'मीरात–उल–अखबार' हे वर्तमानपत्र सुरू. ॲंग्लो हिंदू शाळेचा प्रारंभ. 'ब्रीफ रिमार्क्स ऑन एन्शन्ट फीमेल राइटस्' प्रकाशित.

1823 : 'प्रेस कायद्या'च्या विरोधात सुप्रीम कोर्टाला निवेदन सादर. 'मीरात–उल–अखबार'चे प्रकाशन थांबले. अधिक 'मुक्त व सुसंस्कृत शिक्षण पद्धती'ला चालना देण्याची विनंती करणारे पत्र श्री. ॲमहर्स्ट यांना.

1824 : सोसीएटे एशियाटीक ह्या पॅरिस येथील संघटनेचे सदस्यत्व.

1826 : वेदांत महाविद्यालयाची स्थापना.

1828 : लॉर्ड विल्यम बेंटीक यांचे कलकत्त्यास गव्हर्नर जनरल म्हणून आगमन. ब्रह्मसभेची स्थापना.
खटले ज्यूरींच्या माध्यमातून चालवले जावेत हा विचार मांडला.

1830 : नोव्हेंबर महिन्यात इंग्लंडला जहाजाने रवाना.

1831 : एप्रिल महिन्यात इंग्लंडला पोचले. जर्मी बेन्थॅम यांची लंडनला भेट. ईस्ट इंडिया कंपनीचा पाहुणचार स्वीकारून भोजन. राजा विल्यम चतुर्थ त्याच्या समवेत यांची समक्ष भेट. पासपोर्ट पद्धती बंद व्हावी व श्रेष्ठ राष्ट्र संघाची स्थापना व्हावी या संदर्भात श्री. टॅलिरॅन्ड यांना विस्तृत पत्र लिहिले

1832 : समाज सुधारणेच्या कायद्याचे जोरदारपणे समर्थन केले. कायदा पास झाला. पॅरिसला भेट. फ्रान्सचा राजा लुईस फिलीप्पी यांच्याशी मुलाखत.

1833 : लंडनहून ब्रिस्टॉलजवळच्या स्टॅपल्टन हिल येथे प्रयाण.
तेथेच 27 सप्टेंबर रोजी निधन.

# संदर्भसूची

या संक्षिप्त संदर्भसूचीत राजा राममोहन रॉय यांच्या बंगाली आणि इंग्रजीत लिहिलेल्या ग्रंथांच्या संकलित आवृत्तींची माहिती देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे त्यांच्यावर बंगालीत आणि इंग्रजीत लिहिलेल्या पुस्तकांचीही सूची दिली जात आहे. विस्तृत संदर्भसूचीसाठी जिज्ञासूंनी श्री. दिलीपकुमार विश्वास आणि श्री. प्रभातचंद्र गांगुली यांनी तयार केलेली आणि श्री. कोलेट यांनी लिहिलेल्या 'द लाइफ ॲन्ड लेटर्स ऑफ राजा राममोहन रॉय' तृतीय आवृत्ती या ग्रंथात समाविष्ट केलेली 'अ लिस्ट ऑफ राजा राममोहन रॉयज् पब्लिकेशन इन डिफरन्ट लँग्वेजेस' ही संदर्भसूची पाहावी.

## बंगाली

श्री. राजा राममोहन रॉय यांच्या संग्रहित लेखनाची प्रथम आवृत्ती १८३९ साली आनंदप्रसाद बॅनर्जी यांनी काढली. त्यानंतर खालीलप्रमाणे रचना प्रकाशित झाल्या–

राजा राममोहन रॉयप्रणीत ग्रंथावली एडिटेड बाय राजनारायण बसू ॲण्ड आनंद चंद्र वेदांतवगीस. कलकत्ता. 1880. राजा राममोहन रेअर संस्कृत ओ वंग ग्रंथावली, पब्लिश्ड बाय द पानिनी ऑफिस. अलाहाबाद 1905.

राममोहन ग्रंथावली, एडिटेड बाय ब्रजेंद्रनाथ बॅनर्जी ॲण्ड सजनी कांत दास. कलकत्ता. 1359 बंगाली सन.

## ENGLISH

आजपर्यंत श्री. राजा राममोहन रॉय यांच्या लेखनाच्या खालीलप्रमाणे आवृत्त्या निघाल्या आहेत :

1) The English Works of Raja Rammohun Roy, edited by Jogendra Chunder Ghosh, compiled and published by Eshan Chander Bose, Volume I, Oriental Press. Calcutta. 1885

2) The English Works of Raja Rammohun Roy, edited by Jogendra Chunder Ghosh, republished in three Volumes by Srikanta Roy. Calcutta. 1901.





3) The English Works of Raja Rammohun Roy, including some additional letters and an English translation of the Raja's Tuhfat-ul-Muwahiddin with an introduction by Ramananda Chatterjee. Panini Office. Allahabad. 1906.

4) The English Works of Raja Rammohun Roy, edited by Kalidas Nag and Debajyoti Burman, in seven parts I to VI are at present available. Published by the Sadharan Brahmo Samaj. Calcutta. 1945-51.

श्री. राजा राममोहन रॉय यांच्यावर प्रकाशित झालेले लिखाण :

## BENGALI

1) Banerji, Brajendranath. Rammohan Ray (Sahitya - Sadhak - Charitmala, no.16). 4th edn. Bangiya Sahitya Parishad/ 1353 B.S.

2) Basu, Sasibhushan. Raja Rammohan Rayer Jivani. 2nd edn. Calcutta. 1332 B.S.

3) Chakravarti, Ajit Kumar. Raja Rammohan. Calcutta. 1934.

4) Chatterjee. Nagendranath. Mahatma Raja Rammohan Rayer Jivancharit. 5th edn. Indian Press. Allahabad. 1928.

5) Das, Jogananda. Rammohan O Brahmo Andolan. Sadharan Brahmo Samaj. Calcutta. 1353 B. S.

6) Ganguli, Prabhat Chandra. Rammohan Prasanga. Sadharan Brahmo Samaj. Calcutta. 1353 B. S.

7) Sastri, Sivanath. Rammohan Roy. Calcutta. 1886.

8) Sen Sastri, Kshitimohan. Yugaguru Rammohan. Calcutta. 1952.

9) Togore, Rabindranath. Bharatpathik Rammohan Roy. Visvabharati. 1366 B. S.

## ENGLISH

1) Ball, Upendranath. Rammohun Ròy: A study of his Life, Works and Thoughts. U. Roy & Sons. Calcutta. 1933.

2) Banerji, Brajendranath. Rajah Rammohun Roy's Mission to England.

3) Carpenter, Lant. A Review of the Labours, Opinions and Character of Rajah Rammohun Roy in a Discource on occasion of Death, Delivered in Lewin's Mead Chapel, Bristol; A series of illustrative Extracts from his

Writings; And a Biographical Memoir to which is subjoined on Examination of some Derogatory statements in the Asiatic Journal.

London and Bristol. 1833.

4) Carpenter, Mary. Last Days in England of the Rajah Rammohun Roy. London 1866. Reprinted by Rammohan Library. Calcutta. 1915.

5) Chakravarty, Satis Chandra (ed.). The Father of Modern India : Commemoration Volume of the Rammohun Roy Centenary Celebrations, 1933. Calcutta. 1935.

6) Chatterjee, Ramananda. Rammohun Roy and Modern India. 1918.

7) Collet, Sophia Dobson. The life and letters of Raja Rammohun Roy. 3rd Edn. Sadharan Brahmo Samaj. 1962.

8) Ganguli, Nalin Chandra. Raja Rammohun Roy. Builders of Modern India Series. Y.M.C.A. Publications. Calcutta. 1934.

9) Home, Amal. Rammohun Roy : The Man and his Work. Calcutta. 1933.

It has been incorporated in the commemoration Volume of the Rammohun Roy Centenary Celebrations.

10) Majumdar, Jatindra Kumar and Chanda, Ramaprasad (ed.) Letters and Documents Relating to the Life of Raja Rammohun Roy, Vol.I (1791-1830). Oriental Book Agency. Calcutta. 1938.

11) Majumdar, Jatindra Kumar (ed.) Raja Rammohun Roy and the Last Moghuls : A Selection from official Records, 1803-1839, with an Historical Introduction. Art Press. Calcutta. 1939.

12) Mujumdar, Jatinara Kumar (ed.) Raja Rammohun Roy and Progressive Movements in India : A selection from Records, 1775-1845, With an Historical Introduction. Art Press. 1941.

13) Max Muller, F. Biographical Essays. Longmans. London. 1884.

14) Muore, Adrienne. Rammohun Roy and America. Sadharan Brahmo Samaj. Calcutta. 1942.

15) Samaddar, R. N. Raja Rammohun Roy. 1911.

16) Seal, Brajendranath. Rammohun Roy, The Universal man. Sadharan Brahmo Samaj. Year of publication not mentioned.